सुविचार माला ५

# दृष्टीआडच्या सृष्टींत

# सुविचार माला

## प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें

### १ लोककथा व लोकगीतें

खेड्यापाड्यांतील समाजांत प्रचलित असलेल्या सुन्दर गोष्टींचा व गाण्यांचा संग्रह.

संग्राहक : **वि. वा. जोशी** कि. १० आणे

### २ डॉक्टर शरच्चन्द्र

आंग्ल नवलकथाकार स्टीव्हनसन यांच्या 'डॉ. जेकिल आणि मि. हाइड' या जगद्विख्यात अद्‌भुत कथेचें रूपांतर.

अनुवादक : **नरहर लक्ष्मण आठवले** कि. १ रु.

### ३ आमच्या देशाची स्थिति

सत्तावीस वर्षे जप्ती भोगलेला निबंधमालेंमधील कळसाचा निबंध.

लेखक : **विष्णुशास्त्री चिपळूणकर** कि. १२ आणे

### ४ आराधना

विदर्भांतील विख्यात कवीचा काव्यसंग्रह. कल्पनारम्यता, भावपेशलता आणि तत्वगंभीरता या तीन्ही गुणांचा इतक्या प्रमाणांत एकत्र संनिवेश असलेला दुसरा काव्यसंग्रह अलीकडे क्वचितच प्रसिद्ध झाला असेल.

कवि : **वामन नारायण देशपांडे** कि. १। रु.

# दृष्टीआडच्या सृष्टींत


लेखिका

' श्यामा '



सुविचार प्रकाशन मंडळ, लिमिटेड

शके १८६०] नागपूर [सन १९३८

किंमत १ रुपया

# प्रकाशकांतर्फे

इतकेंच सांगावयाचें की 'श्यामा' यांचें हें पुस्तक प्रसिद्ध करतांना आम्हांस विशेष आनंद होत आहे. यांतील कित्येक दृश्यें पूर्वीं 'स्त्री', 'प्रतिभा', 'संजीवनी' वगैरे नियतकालिकांतून प्रसिद्ध झालीं असून कित्येक नवीन व आजवर प्रकाशित न झालेलीं अशीं आहेत. समाजांतील करुण, दारुण दृश्यें ज्या सोज्वळ व संयमित भाषेने श्यामा यांनी वर्णिलीं आहेत तिजमुळे त्या वर्णिलेल्या दृश्यांस अधिकच मनोहरता आली आहे, असें आम्हांप्रमाणे वाचकांसही वाटेल. शेवटचीं सात दृश्यें पाश्चात्य समाजाचीं आहेत. त्यांच्यामधील व पहिल्या दृश्यांमधील विरोध वाचकांच्या मनास बोचेल. देशाभिमानी वाचकांचें अंतरंग चिडून उसळून उठेल. हें सर्व खोटें असेल, लेखिकेने कांही तरी बनवून लिहिलें असेल, अशी आपल्या मनाची ते समजूत करून घेऊं पाहतील. परंतु अशा पोकळ समजुतीने कितीजण कितीसें समाधान करून घेऊं शकतील? 'तिकडे तसें कां? आणि आमच्याकडे हें असें कां?' असा प्रश्न अखेरीस प्रत्येकाच्या मनांत उभा राहीलच. ज्यांच्या मनांत कळकळ असेल त्यांना हा प्रश्न अस्वस्थ करील, सतावून सोडील. कळकळ नसेल त्यांच्या मनांत कळकळ उत्पन्न करील. आणि असें झालें तर हीं दृश्यें लिहिल्याचें व प्रकाशित केल्याचें पूर्ण सार्थक झाल्यासारखें होईल.

प्रकाशक

# अनुक्रमणिका





# दृष्टीआडच्या सृष्टींत

आज त्या पुऱ्यांतून आल्यापासून माझें डोकें कसें फिरून गेलें ! रागावूं तरी कोणावर ? मी स्वतः हें काम पत्करलें कशाला म्हणून माझ्यावर रागावूं, की धर्मावर रागावूं, का रूढीला शिव्या देऊं !

आपल्या हातून कांही तरी व्हावें—चोहोकडे कामाचे डोंगर पडले असतां एकच काम सत्राशें जणींना करावयाला पाहिजे; इतरत्र किती कामें आहेत पण त्यांकडे कोणी ढुंकून सुद्धा पाहत नाही; आपण यांतून निराळा मार्ग काढला पाहिजे; युरोपियन स्त्रियांप्रमाणें नाना क्षेत्रांत शिरायला पाहिजे; म्हणून मी मोठ्या आवडीने हें समाज-सेवेचें काम पत्करलें. काय अभिमान वाटला त्या वेळीं मला ! 'सर्व्हंण्ट्स ऑफ इन्डिया' म्हणून म्हणवून घेतांना त्याच्या आद्य चाल-कांना सुद्धा इतका अभिमान वाटला नसेल ! पण नुसतें समाज–सेविका म्हणून स्वतःला गौरवून घेणें आणि प्रत्यक्ष काम करणें यांत किती अंतर आहे !

आज मिस् रोझबरोबर त्या पुऱ्यांत गेलें. बोलून चालून आम्ही महारवाड्यांत गेलेल्या. अशा वेळीं मी कांही त्यांच्याकडून मोठ्या मानमरातबाची अपेक्षा केली नव्हती; पण अशा अनपेक्षित रीतीने

माझें स्वागत होईल अशी कल्पनासुद्धा मनांत आली नाही एवढें खरें. त्या ठिकाणीं शिरल्यापासूनचा सारा देखावा कसा माझ्या दृष्टी-समोर स्पष्ट उभा आहे. अगदी ती पहिली उजवीकडची लिंबाखालची झोपडी. एक म्हातारी, केस पिंजारलेली बाई गोधडी शिवीत घराच्या पुढच्या जागेंत बसली होती. तिच्या त्या केस पिंजारून बसण्यांत मला कांहीच अस्वाभाविक वाटलें नाही. सारें कसें भोवतालच्या चित्राला साजेसेंच होतें. ती एवढीशी झोपडी खरी, पण किती स्वच्छ! लिंबाखालची जागा कशी झाडून सारवून स्वच्छ राखिली होती. त्यांतच अंगणांत बसून दुपारच्या प्रहरीं ती गोधडी शिवीत होती. जवळ ४–६ महिन्यांचें मूल जमिनीवरच कायसेसें चोखीत पालथें पडलें होतें. छान गुटगुटीत होतें तें पोर.

आम्ही त्या बाईला विचारतांक्षणीं पालथ्या पालथ्याच जरा मान उचलून किती सहज डौलदार रीतीने त्याने आमच्याकडे पाहिलें. गोड होतें तें दृश्य! तो लिंब, त्याखालची गोधडी शिवीत बसलेली म्हातारी; जवळ धुळीने आंग माखलेलें, देवी काढल्याची साक्ष पटविणारे मोठचा मोठ्या वणाचे पण गोंडस हात पसरून पडलेलें तें मूल; दुपारची विश्रांतीची वेळ; शांततेचें किती भोळें भाबडें गोड चित्र होतें तें! मी त्या बाईला विचारलें, "बाई बसूं कां?" "हो तर बाई. नको कोण म्हणते?" असें साध्या भावाने म्हणून तिने जवळ उभी केलेली खाट टाकली. आम्ही दोघी त्यावर बसलों. मला तिच्याशीं एक क्षण काय बोलावें तेंच कळेना. खरंच काय बोलायचं तिच्याशीं? काय हिला मी तुम्हांला सुधारण्याला आलें म्हणून सांगूं, की हिला शिवायची आवड दिसते म्हणून आम्ही उद्यापासून एखादा शिवण्याचा वर्ग काढला तर त्याला येशील कां म्हणून विचारूं? माझें सारें शिक्षण आज मला निरुपयोगी वाटलें. थॉमस हार्डीच्या कादंबऱ्या वाचतांना इंग्लंडमधील खालच्या वर्गाशीं सुद्धा समरस होऊन वाचणारी मी आज माझ्या देशांतल्या, माझ्या समाजांतल्या, माझ्या

धर्मातल्या एका बाईशीं सहज बोलूं शकलें नाही. सहज प्रश्न विचारायचे म्हणून सुरुवात केली. "बाई, किती महिन्यांचें मूल ?" "असल बाई ५–६ महिन्याचं." झालें, तिचें माझें भाषण सहज सुरू झालें. खरोखर लहान मूल म्हणजे कोणत्याही दोन स्त्रीहृदयांना सांधणारा एक दुवाच आहे. कोणत्याही बाईपाशीं मूल असूं द्या. तुमची तिची १५ मिनिटांच्या आंत गट्टी जमेल.

तिचें माझें भाषण चालू होतेंच. रस्त्याने मधून मधून ओढ्यावरून धुणें धुवून येणाऱ्या बायका जात येत होत्या. आम्हांला तिथे बसलेल्या पाहिल्या की थबकून त्या तिथे थांबत. त्यांच्या चेहऱ्यावरचें तें कुतूहल, विशेषतः नवीन पाहिल्याबरोबर कोणत्याही तऱ्हेने न लाजतां अगदी डोळे लावून पाहण्याची ती पद्धति, साऱ्याची कशी मला मजा वाटली. त्यांच्या उभे राहण्याच्या पद्धतींत तरी किती स्वाभाविक डौलदारपणा होता ! डोक्यावर धुणें घेऊन गुडघ्यापर्यंत लुगडें खोवून तोंडांत बोटें घालून अभावितपणें उभी राहणारी एक पोरगी तर मला फारच आवडली. मी तिला विचारलें, "काय ग तुझें नांव ?" पण ती काय म्हणून उत्तर देईल ? तिने मान फिरवली नी पुढे चालती झाली. जातां जातां मागे वळून पाहत होती. पण माझ्या प्रश्नाला उत्तर देण्याकरितां खास नव्हे.

झालें, आम्ही आल्याची बातमी किती तरी चटकन येथे पसरली. एक 'साहेबीण' आणि एक बाई आली आहे. एवढीशी गोष्ट त्या वस्तींत खळबळ उडवायला अगदी पुरेशी होती. मिस रोझ तोडक्या मोडक्या मराठींत त्या म्हातारीशीं बोलत असतां मी इकडे तिकडे पाहत होतें. झोपड्यांच्या पुढच्या अंगणांत कोणी बायका पोरें घेऊन येऊन बसल्या, कोणी तेलफणी घेऊन केस विंचरीत दारापुढे बसून राहिल्या, कोणीं दगडाजवळ भांडीं घासायला सुरवात केली. थोडक्यांत, दुपारच्या वेळीं त्या वस्तींत जेवढ्या बायका जमणें शक्य आहे तेवढ्या साऱ्या निरनिराळ्या निमित्ताने आपल्या झोपडीबाहेर येऊन उभ्या

राहिल्या. त्यांतल्याच चौघी पांचजणी त्या म्हातारीच्या दाराशीं जमल्या. कोणी दांत कोरीत तर कोणी दोन्ही ओचे हातांत धरून. पण साऱ्यांचे डोळे आमच्याकडे लागलेले.

लहान पोरेंपोरी तर आमच्यापासून दहापंधरा हातांच्या अंतरावर जमून अगदी टक लावून आमच्याकडे पाहत होतीं. त्या वेळीं मला अगदी लहानपणची आठवण झाली. एखादा अस्वलवाला किंवा माकडवाला आला म्हणजे आम्ही अशाच उभ्या राहत असूं. पण आज त्या अस्वलवाल्याची पाळी आमच्यावर होती. काय विचित्र दिसत होता तो जमाव. इतर वेळीं मी "काय हीं घाणेरडीं पोरं" असें म्हणून त्यांच्या शेजारीं सुद्धा गेलें नसतें व विचारही केला नसता. पण माझें हें कार्यक्षेत्र या नात्याने त्यांच्याकडे दृष्टि टाकतांना माझें मलाच किती तरी अवघड वाटलें.

त्यांच्याशीं बोलण्याचा प्रयत्न करणें निष्फळ होतें. मी एकदोघी पोरींना प्रश्न विचारले. त्यांतली एक भिऊन पळून गेली. एक जरा मोठी व धीटही होती. तिने दुसरीकडे बघून हसायला सुरवात केली. त्या दोघींचें तें हसूं निर्विकारतेने घ्यायला माझ्या मनाची सारी तयारी त्या वेळीं जरा लंगडीच पडली. माझ्या समाजांत मी असतें तर...खास संतापलेंच असतें. पण त्या संतापाचें येथे काय होय? निमूटपणें मी आणि मिस रोझ त्या चारपांच बायका व म्हातारी बसली होती तिकडे वळलों. त्यांच्याकडे पाहून आम्ही जरा हसल्यासारखें केलें. मिस रोझ नमस्कार म्हणायला शिकल्या होत्या. त्यांनी नमस्कार केला.

बोलण्याला आरंभ आम्हीच केला. थोड्याच वेळांत रस्त्यावर कांही गंमत झाली म्हणजे चार लोक जमावे तशाच साऱ्या बायका आमच्याभोवती जमल्या. आम्हीही रंगलों. हळूहळू नवथरपणाचा पडदा दूर झाला. त्याबरोबर त्याही बायका हसून खेळून मिस रोझ-विषयीं प्रश्न विचारूं लागल्या. त्यांनी सारें सारें विचारून घेतलें. त्यांच्या पोषाकाविषयीं व एकंदर अंगांत घालण्याच्या कपड्यांविषयीं

त्यांची फारच उत्सुकता दिसली. त्यांनी नाही ते प्रश्न विचारले. एरव्ही कुठे जर ते प्रश्न विचारले असते तर मिस रोझना अपमानच वाटला असता. पण येथलें सारें कांही न्यारेंच होतें. सुधारलेल्या समाजाच्या अंगीं मुरलेले शिष्टाचार येथे माहीत होते कोणाला ?

माझ्याजवळ बसलेली म्हातारी चांगलीच रंगांत आली. तिने आपल्या पसरलेल्या पायांवरून एकवार हात फिरविला व दातवणाने काळ्या पडलेल्या दातांची कवळी बाहेर काढीत काढीत मला सांगितलें, "बाई आता एक गाणें गा ना." मला गातां येत नाही म्हणून, नाही तर त्यांच्याशीं मिसळण्याच्या त्या भरांत मी कदाचित गायला सुरवातही केली असती व मग त्यांच्या विचारण्याचा अर्थ मला कधीच कळला नसता. तिच्या प्रश्नाला मी साहजिकपणें "बाई मला गातां येत नाही" म्हणून उत्तर दिलें. म्हातारी फिरून हसून म्हणाली, "बाई, तुम्ही लोक तर नेहमी गातां, तुला नाही गायला येत ? " तिच्या बोलण्याचा मला कांहीच अर्थ कळेना.

मी गोंधळून तिच्याकडे व बायकांकडे पाहूं लागलें. पण साऱ्या बायका जणू काय तिचा प्रश्न म्हणजे अगदी साहजिक प्रश्न, अशाच मुद्रेने माझ्याकडे पाहत होत्या. "तुमच्याजवळ तें बुक नाही ? तें बुकांतलें गाणें." म्हणून म्हातारीने हातांनी लिहिलेल्या गाण्याचा जो अभिनय करून दाखविला तो इतका स्पष्ट होता की, सुप्रसिद्ध मूकाभिनयपटु नट चार्ली चॅपलिन याला सुद्धा तो इतक्या सफाईने साधला असता की नाही याची शंकाच आहे. तिच्या शब्दांनी, कृतींनी, डोळ्यांनी माझ्यासमोर एक अगदी लहानपणीं पाहिलेलें चित्र उभें केलें. मला लहानपणीं खेडेगावांत राहत असतां पाहिलेल्या एका गाणाऱ्या मिशनरी बाईची आठवण झाली. त्या आठवणीबरोबर कसेंसेंच झालें. मी जरा चिडल्यासारखी होऊन तिला विचारलें, "कोणाचें गाणें म्हणतां बाई तुम्ही ? आमच्याजवळ तर बुकबिक कांहीच नसतें." ती म्हातारी मोठ्याने हसली. जणू काय मी असें उत्तर देईन अशी तिची अपेक्षाच होती. तिच्या हसण्याने

साऱ्यांना मजा वाटली. म्हातारीही जरा चढून गेली. " बाई, बाई, तें– तें तुमच्या देवाचें गाणें." म्हणून साभिनय तिने प्रश्न केला.

मी मिस् रोझकडे पाहिलें. त्यांना चाललेल्या प्रश्नोत्तरांपैकी कांहीच कळत नव्हतें. त्या नुसत्या त्या बायकांकडे व माझ्याकडे पाहत होत्या. त्यांना मी इंग्रजींत त्या बायकांचा प्रश्न समजावून सांगितला. तरी विशेषसा अर्थबोध झाल्याचें दिसलें नाही. पण मला त्यांच्या प्रश्नाविषयीं शंका उरण्याचें कारणच नव्हतें. काय वाटलें त्या वेळीं मला याची कल्पना आली की मन चरकतें. चांगली मी जातीने ब्राह्मण असून आज या बायका मला समजताहेत तरी कोण ? ख्रिस्ती ? छे ! यांना एवढें सुद्धा ओळखण्याची अक्कल नाही ? "मी काय ख्रिस्ती दिसतें तुम्हांला ?" असें विचारण्याचें माझ्या मनांत आलें–पण नको मी आणि ख्रिस्ती यांचा संबंध एका वाक्यांत जोडून, प्रश्न विचारून त्यांची परीक्षा पाहणें सुद्धा बरें नाही. मी ठासून उत्तर केलें, "बाई मी ब्राह्मण आहें, तुम्हांला मी वाटलें तरी कोण ? तुमचा देव तोच माझा देव, कोणत्या देवाचें तुम्ही गाणें म्हणतां ? कृष्णाचीं, विठोबाचीं तुम्ही नाही का गाणीं गात ? तींच आम्ही गातों. आमचा देव निराळा नाही." आता शांतपणें विचार करतां करतां मला वाटतें की खरोखर हीं महार माणसेंसुद्धा माझ्याच धर्माचीं आहेत ही गोष्ट आज त्यांनी मला खडयासारखी उचलून टाकण्याचा प्रयत्न केला नसता तर कधीच ठसली नसती. "बाई, मी कांही मिशनरी नाही. आपला चांगला हिंदु धर्म आहे, चांगला आहे तो सोडून दुसऱ्या कोणत्या देवाचें गाणें मी उगीच कशाला म्हणूं ?" मी चटकन हें बोलून तर गेलेंच. माझ्या दिसणाऱ्या फणकाऱ्याने त्या बायका जरा चमकल्या, स्तब्ध राहिल्या, तरी पण त्या खात्री पटल्यामुळे खास नाही हें त्यांच्या चर्येवरून निर्विवाद दिसत होतें. माझ्या विधानाची त्यांना शंकाच होती. पण मी रागावलें ही गोष्ट त्यांनीं ताडली. हळूहळू आम्हीही आपलें भाषण आटोपतें घेऊन दुसरीकडे गेलों. पण माझ्या डोक्यांतून मात्र झालेला प्रकार जाईना.

काय ही आज आपल्या समाजाची स्थिति ! मी आणि मिस रोझ. एक अस्सल हिंदु-हिंदी, एक अस्सल परदेशी. पण आज आमच्या समाजांत काम करायला गेलें असतां दोघीही सारख्याच विदेशी ठरलों ! हिंदूलाच हिंदू ओळखूं शकत नाही. मी त्यांच्यांत जाऊन मिसळूं पाहतां त्यांना ख्रिस्ती मिशनरी वाटलें. मी ब्राह्मण आहें असें ठासून सांगून सुद्धा त्यांना माझा विश्वास पटला नाही. कदाचित् मिस रोझबरोबर असल्याने असें झालें असेल. पण तरी काय? त्यांना मी एकदम इतकी कां परकी वाटावी ? बाकी कां वाटूं नये ?

एक ब्राह्मणाची बाई त्यांच्या वस्तींत येऊन त्यांच्याशीं बोलूं शकते ही कल्पनाच त्यांना किती नवीन आणि परकी आहे ! आज-पावेतों या समाजाचें अस्तित्व तरी मला कधी जाणवलें होतें का ? मी त्यांच्या वस्तींत जातांक्षणीं मला मी आपल्या लोकांत वावरतें आहे असें वाटलें नाही. जितकें मिस् रोझला त्यांच्यांत परकीय वाटेल तितकेंच मला वाटलें. तिला भाषा येत नव्हती. मला भाषा येत होती. तरी काय ? तिला कोठेंही बसायला संकोच वाटत नव्हता. संकोच वाटला असेल तो काय तो जराशा अस्वच्छतेने. पण माझें तसें नव्हतें. माझ्या मनांतील हजारों वर्षांचे संस्कार "तूं आज महारांत बसली आहेस" अशा अस्पष्ट जाणिवेने मला अस्वस्थ करीत होते. मग माझ्याविषयीं तरी त्यांना विश्वास कां वाटावा ? त्यांच्यांत जाऊन काम करणारे, त्यांना जवळ करणारे, असे कोणी लोक त्यांना भेटत असतील तर ते ख्रिस्ती मिशनरीच. मग त्यांच्याहून एखादी निराळी बाई अकारण त्यांच्या वस्तींत हिंडूं लागल्यास त्यांनी तिच्याविषयीं 'मिशनरी' म्हणून कल्पना करून घेतली तर त्यांचा दोष तो खासच नाही !

नुसत्या ह्या अस्पृश्य वर्गाचीच ही गोष्ट नाही. पांढरपेशे वर्गाशीं मिसळणारे थोडेसे कुणबी वगैरे सोडले तर सारेच आमच्यापासून इतके दूर नाहीत का ? त्यांना आम्ही त्यांचे वाटत नाही. आम्हांला ते आपले वाटत नाहीत. आमच्या आकांक्षांनी त्यांचीं मनें कधीच

उचंबळून येत नाहीत. आम्ही त्यांचा कधीच जरूरीशिवाय विचार करीत नाही.

हिंदुस्थान सुधारण्याच्या गप्पा मारे जोराजोराने आम्ही मारीत असतों, पण समाजपुरुषाला पाठीच्या कण्याप्रमाणें आधारभूत असलेल्या ह्या अज्ञ लोकांकरितां आम्ही काय करतों आहों? मिशनरी लोकांना आम्ही नांवें ठेवतों, हसतों, त्यांचा उपहास करतों. ते आज पांच हजार कोसांवरून येतात. त्यांना या समाजाच्या तळाशीं वावरतांना घाण वाटत नसेल का? पण आज ते लोक, आमच्या दृष्टीने खोटचा पण त्यांच्या दृष्टीने खऱ्या व उच्च अशा भावनेने प्रेरित होऊन केवढें कार्य करीत आहेत? जिथे बैलगाडी सुद्धा जाऊं शकत नाही अशा ठिकाणीं जाऊन या लोकांनी आपले मठ स्थापन केले आहेत. कल्पना करा, सुधारलेल्या सुखसोयींच्या यांत्रिक जगांतून येऊन खेडेगावांतून असलें उंबराच्या किडयाचें जिणें कंठायचें! किती अवघड गोष्ट आहे ही! आम्ही सुशिक्षित मंडळी नुसते मुंबई पुणें सोडायला सुद्धा तयार नाही. मग असलें एकलकोंडें जिणें सोसायला तयार कोठून? आज खेडयांतून-शहराच्या दूरवरच्या भागांतून-जो लाखों लोकसमुदाय पसरला आहे त्याचा आमचा काय संबंध?...त्यांना आम्ही विदेशी माणसाइतकेच परकी आहोंत. या प्रचंड समुदायाला हालवून जागें केलें तर आजच्या पेक्षा किती तरी झपाटयाने कार्य होईल.

मला या वेळीं 'हिंदुधर्म व सुधारणा'कर्त्या गोळयांचें वाक्य आठवतें. "शहरांतून विजेचा झगझगाट चकचकाट दृष्टीस पडतो पण त्याला येणारी शक्ति अज्ञात प्रदेशांत उत्पन्न झालेली असते."

ही अज्ञात शक्ति शोधून कामीं लावण्याचें कार्य आज व्हावयास पाहिजे आहे.

आगष्ट १९३०.

# मोठ्या मायेचें बोलावणें

कोपऱ्यांत केशरी मुण्डासें घातलेला एक माणूस तोंडानें कांहीसें पुटपुटत ध्यानस्थ बसला होता. त्याच्यासमोर जोंधळ्याच्या चित्रविचित्र आकृति काढल्या होत्या. त्यांतल्याच एकीवर दिवा ठेविला होता. त्या सगळ्या आकृतींवर हळदकुंकू वाहिलेलें दिसत होतें. तान्हीचें आंथरूण पार गुण्डाळून ठेवून तिला भिंतीला टेकून तेथे जवळच बसवली होती. मी तिच्याकडे पाहिलें; ती पुरी भानावर सुद्धा नव्हती. तिची मान, तारवटलेले डोळे, सारें इतकें कांही विचित्र दिसत होतें, की खरें म्हणजे कांबळें पांघरून ती तशी बसूं कशी शकली याचेंच मला आश्चर्य वाटत होतें.

मी त्या सगळ्या देखाव्याकडे पाहतच उभी होतें, तों तान्हीची आई आली. मला पाहतांच खरें म्हणजे ती चमकलीच. पण किती ? एक क्षण. लगेच डोक्यावरची घागर खाली ठेवून ती आंत गेली, त्यांतल्या कडुनिंबाच्या पाण्याने तिनें तान्हीवर सिंचन केलें; आणि बरोबर असलेली जोंधळ्याची पिवळी पिवळी आंबील तिने तान्हीला खाऊं घालण्यास सुरवात केली.

हें सारें करीत असतां तिच्या हालचाली इतक्या निश्चयाने व शांतपणें चालल्या होत्या की, माझ्या अस्तित्वाला सुद्धा त्यांत कुठे वाव नव्हता; मात्र माझा एखादाच वावगा शब्द त्या वेळीं निघायला पाहिजे होता, की सुरुंगाची बत्ती शिलगावल्याप्रमाणें वरचा तो दगडी शांतपणा व निश्चय कोसळून भडका मात्र खास उडाला असता. आपल्या एका शब्दाने उपाय होण्याऐवजी अपायच व्हावयाचा हें मला पुरें कळून चुकलें. मी नुसती पाहत राहिलें. तो ध्यानस्थ बसलेला मनुष्य मधून मधून माझ्याकडे डोळे उघडून पाही. पण तान्हीची आई माझ्याकडे पाहतसुद्धा नव्हती. आणि तान्ही तर पुरी बेसावधच होती. आणलेल्या आंबिलीचीं दोन तीन बोटें तिच्या आईने तिला चाटवलीं, पण तीं सुद्धा पुरीं आंत न जातां बाहेर आलीं. बेभानपणें डोळे उघडून तिने एकदा आजूबाजूला पाहिलें.

त्या सर्व देखाव्याने तर माझा संताप क्षणाक्षणाला वाढतच चालला. पण तितकाच तो दाबून शांतपणा धारण करण्याची आवश्यकता आहे असें विचारी मन मला दरडावून सांगूं लागलें. अखेर धीर धरवेना. कांही तरी बोलून संतापाला वाव द्यावयाचा म्हणून मी विचारलेंच, "तान्हीचा ताप उतरला का ?"

तिची आई तयारच होती.

"ताप! ताप उतरतोय अशाने ? तो का साधा ताप हाय ? देवीचा कोप हाय त्यो. त्येला कोठे असं विंग्रजी औषध चालतंय व्हय ? म्हणे ताप उतरला काय ? देवी तर डॉक्टरला बोलावला म्हणूनच रागावली हाय !"

"अग असं कुठं होतं का ?" मी जरा बोलण्याचा प्रयत्न केला. पण ती बोलूंच देईना.

"बरं झालं बाय; मला सुबद्ध झाली आणि तुमचं औषध दिलं न्हाई. नाही तर एवांना कामच झालं असतं. माझी प्वार हातांतनं गमावली असती !"

"औषध दिलं नाही !" माझ्या तोंडन आश्चर्यातिरेकाने स्तंभितच होऊन शब्द बाहेर पडले !

"हो ! मी द्येयाला बसलंय् औषध ?"

"पण मग औषधाचें काय केलेंस ? "

"काय करायचं त्येंच केलं. तूं आणून दिलंस म्हणून मी देईन असं वाटलं होय तुला ?" तुम्हीची भाषा मीतूंवर आली. इतका वेळ गप्प बसलेल्या मांत्रिकाने आता डोळे उघडले; आणि तिच्या समर्थनार्थ म्हणन तोही भोप्या बोलूं लागला.

" बाई, हा देवीचा ताप आहे. त्येला डॉक्टरी औषध नाही लागू पडत." जणू काय असल्या गोष्टी मला समजणें कठीण अशा स्वरांत तो सांगूं लागला. "बाई, देवी रागावली आहे हिच्यावर. तिला भूक लागली आहे. त्याला निराळंच औषध हवं." असें म्हणून सूचक मुद्रेनें त्याने माझ्याकडे पाहिलें.

मीही डोळे फाडून त्या लोकांकडे पाहूं लागलें. तान्हीची आई, तो मांत्रिक आणि देवीपुढे बेभान पडलेली ती तान्ही ! करणार तरी काय हे लोक त्या पोरीचें ! मारणार काय ? एक वेळ मनांत आलें, कायद्याची दहशत घालून पोरीला घेऊन नाही का जातां येणार ? पण असा कोणताच कायदा माझ्या पाठीशीं नव्हता. कायदा आंधळा आहे. वेड्या समजुतीने किंवा कसें का होईना, आईबाप मुलांचे प्राणही घेऊं शकतात, हें कायद्याला दिसत नाही ना? रागावण्यांत तर कांहीच फायदा नव्हता. मी त्यांच्या घरांत होतें. त्यांनी मला घालवून दिलें असतें, तर मी त्यांचें कांहीच करूं शकत नव्हतें. एक मन सांगूं लागलें, 'जा येथून आता. तुझा येथे उपयोग नाही.' दुसरें मन माघार घेईना. 'माघार ? मग कशी तूं काम करणार ?' बुचकळ्यांत पडलेली मी विचार करूं लागलें. करूं तरी काय इथे ? काय करूं ? 'एक उपाय चालत नाही तर दुसरा पहा. आता एक वेळ सोडशील, फिरून एक वेळ सोडशील. पण नेहमी–?' दुसऱ्या मनाने उत्तर दिलें.

अखेर मी माझें तंत्र बदललें.

"हं, तान्हीची आई. हा देवीचा कोप तर खराच." मी तिच्याविषयीं सहानुभूतीच्या स्वरांत बोलूं लागलें. "पण बघा तुम्ही चुकलां. औषधाला विटाळ नसतो. औषध म्हणजे प्रत्यक्ष गंगेचं पाणी ! सदैव शुद्ध ! त्याला कसला आला आहे विटाळ ? प्रत्येक वेळीं औषध देतांना देवीच्या पुढे ठेवावं आणि देवीचें नांव घेऊन द्यावं म्हणजे कांही दोष नाही की देवी रागावत नाही. आम्ही असंच करतों. असं भांड्यांत औषध घ्यावं, देवीचं नांव घ्यावं, 'औषधं जान्हवी तोयं' म्हणावं आणि एकदम घशांत. प्याल्यानंतर मात्र भांडं पालथं टाकावं लागतं, म्हणजे त्याचा ओघळ येतो तो धरित्रीला मिळतो आणि ती संतुष्ट होते."

माझ्या तंत्राचा परिणाम झाला नाही असें नाही. एकूण मी अगदीच देवीच्या विरुद्ध–विग्रजीच–नव्हे तर ! तिला तितकी खात्री पटली व बरें वाटलें. विशेषत: औषध घेण्याचें माझें यथासांग तंत्र तिला फारच पसंत पडलें.—

गंमत आहे या लोकांची. धर्म घ्या, नीति घ्या कोणतीही सुधारणा घ्या, त्यांना आचार पटतो, तंत्र पटतें आणि त्यालाच ते चिकटून बसतात. मी औषधाचें तंत्र सांगितल्याने तिला जितकी खात्री पटली तितकी प्रत्यक्ष औषधाने सुद्धा पटली नसती. आणि त्यांत आम्हीही असेंच करतों असें सांगितल्यावर खास ह्या बाईजवळ देवीसंबंधीं बोलावयाला तर हरकत नाही इतकें तिच्या मनाने घेतलें. आणि तान्हीची आई बोलूं लागली !

"बाई, तसं नव्हं; परवांच मी याला देव पाहयला सांगितलं, पर देवीचें कांही उत्तरच येईना. त्येनं मला सांगितलं की देवी डॉक्टराला बोलावल्यावरून रागावली जणू ! मी अखेर बोलल्यें, 'अरे बाबा डॉक्टर आला, बाईनं त्येचं औषध बी दिलाय, पर मी नाही दिलं माझ्या पोरीला.' अखेर काल सांजपासून साऱ्या रात्रभर अशी देवी बोलावली तवा कुठं सकाळीं देवी बोलली. डॉक्टरचा राग

बीग कांही नाहीं, पर मी देवीचं काय चुकलं व्हय कंदी, त्येचा बरीक कोप झालाय. त्येनंच संतापून जाऊन तिन्हं तान्हीला बोलावणं बी धाडलाय ! माझी छाती धडकूनच गेली. म्हटलं पोर जात्ये. किती देवीच्या पायां पडलें, अर्जवा केल्या. लुगडं चोळी नेंसवीन् बोलल्यें, पांच रुपे दक्षणा बी ठेवीन असं कबूल केलं, तवा कोठ देवी जरा परसन्न झाली. ती बोलली की मला तान्हीची भूक लागली हाय, पर आत्ताची वेळ सोडतें. एक बकरा दे आणि आज आत्ताच्या आत्ता जाऊन माझं तीरथ आण आणि अंगावर शिंपड. त्येला माझा निविद पाठव. मघा न्हव का तुमी मला पाहृचली, तें तिचं मायेचंच करीत होत्यें. आता सांग, माय इक्ती बोलल्यावर दवा कसा देणार ?–"

काय बोलणार मी ? माझे सर्व प्रयत्न निष्फळ होते हें मला कळलें होतें. मी आणलेलीं मुसंबीं देवीच्या प्रसादाला गेलीं होतीं,– औषध ? तें तर गेलेंच. फक्त मी मात्र त्या घरांतून देवीच्या कारणीं लागल्याशिवाय सुटलें.

विषण्ण मनाने मी परत आलें. डोक्यांत एकच विचार येत होता. मायेचें नांव करून तो मांत्रिक पांच रुपये, बकरा, लुगडेंचोळी लाटणार आणि सर्व मिळून पोरीला मारणार ! काय हें अज्ञान ! पण असें वारं-वार म्हणायचें सुद्धा माझ्या जिवावर येतें. ह्या लोकांच्या जीवितावर ही धर्माची बसलेली खोटी पकड पाहिली की मी हताश होतें. ह्यांतून एका पिढींतून डोकें वर काढूं पाहणें म्हणजे निव्वळ दगडाशीं टक्कर घेणें आहे, असेंच वाटूं लागतें. आणि स्वतःवरच चिडून मी गप्प बसतें.

सप्टेंबर १९३२.

# भिकारी वाड्यांत

## १६ नोव्हेंबर

आज त्या मुलाला आम्ही हॉस्पिटलमध्ये टाकला. त्या मुलाची स्थिति म्हणजे खरोखरच आभाळ फाटल्यासारखी नाही का ?

आम्ही सकाळीं मोटारमधून जात होतों तेव्हा आम्हांला एका माणसाने येऊन सांगितलें, "बाई, भारी आजारी मुलगा आहे. त्याला कोणीसुद्धा तसा नातेवाईक नाही. तुम्हीच त्याची काळजी घेतलीत तर. त्याचा म्हातारा चुलता अगदी आंधळा आहे आणिक घरांत कोणी असलें तर माहीत नाही. तो पहा त्याला हॉस्पिटलमध्ये घेऊन चालला आहे."

आम्ही खाली उतरून जवळ गेलों. मी पाहिलें तों एक आंधळा ५५-६० वर्षांचा म्हातारा त्या आजारी मुलाला पाठुंगळीला बांधून घेऊन चालला होता. त्या म्हाताऱ्याची आधी स्वतःची स्थितीच सोसाट्याचे वारे अनेक वर्षें सहन करून क्षीण झालेल्या वृक्षासारखी झाली होती. पण तशाच स्थितींत तो त्या मुलाला घेऊन चालला होता. रस्ता पुरा दिसत नसल्याने मधून मधून ठेचाळत होता. मी त्याला थांबवून विचारलें-

"बाबा, या मुलाला इस्पितळांत ठेवायला तयार आहांत का ? आम्ही करतों त्याची सारी व्यवस्था." त्या दृष्टिहीन, कळाहीन, सुरकतलेल्या चेहेऱ्यावर सुद्धा अंतःकरणांतील कृतज्ञतेने जरा टवटवी आली. "बाई, तुमचें देव कल्याण करो. बघा मी असा आंधळा, घरांत दुसरें कोणी नाही. अशांत या पोराचा कुठे संभाळ करूं ? त्यांतून याचें याला या जागचें त्या जागीं हालतां येत नाही. असें म्हणून त्यानें पाठीवरची मोट उतरली. हरी, बाबा, ऊठ. तुझ्या नशिबाने बघ मायच स्वतः धावून आली."

त्या मुलाकडे पाहून मला काय वाटलें हें सांगतां येणें खरेंच कठीण आहे. त्याच्या निस्तेज होत चाललेल्या प्राणज्योतीला सबंध शरीरावर पसरलेली मृत्यूची छाया दूर करतां येत नव्हती. अंधारांत क्षीण प्रकाशाने चमकणाऱ्या लहानशा ज्योतीने अंधाराचें स्वरूप जास्तच भयाण व्हावें तशाच प्रकारची भीषणता त्याच्या सर्वांगावर पसरली होती. हातपाय अन्नपाण्यावाचून व रोगाने अगदी पिकुटल्या-सारखे होऊन गेले होते.

मोटार जवळ आणतां येणें शक्य नव्हतें व त्याला तर पाऊलसुद्धा टाकायचें सामर्थ्य नव्हतें. अखेरीला एकाने उचलून त्याला व म्हाताऱ्या-ला मोटारींत घातला आणि आमचा मोर्चा हॉस्पिटलकडे वळला.

रस्त्यांत त्या मुलाची हकीकत आम्हांला कळली. त्याला आईबाप कोणी नाही. तो या आंधळ्या चुलत्याजवळ राहत होता. एक दिवस चुलता फार रागावला व त्याने बेदम मारलें म्हणून तो घरांतून पळून गेला. मुंबईंतल्या गोदींत तो कसलेंसें काम करीत असे. चौदा वर्षांचा मुलगा, त्याला गोदींत काय मिळत असेल तें असो, पण तिथे चांगला एक दोन महिने काम करीत होता खरा. मुंबईची वस्ती, लहान वय व टाकून दिलेल्या कचऱ्याप्रमाणें होणारी वाढ. अशा वेळीं तो मुलगा आजारी पडला तर कांहीच नवल नव्हतें. आंव, ताप, यांनी तो चांगलाच आजारी पडला. आपल्या आजारीपणाचें जेव्हा तो मुलगा

सांगायला लागला तेव्हा तर खरंच कुणाचेंही मन कळवळल्याशिवाय राहणें शक्य नव्हतें. तो सांगूं लागला, "बाई, आजारीपणांत एक दिवस भूक लागली, पण खायला कांही नव्हतें. भीक मागून तरी कांही मिळाल्यास पाहावें म्हणून तसाच रखडत उठलों नी चालूं लागलों. जरा नाक्यापर्यंत गेलों न गेलों तों घेरी येऊन फूटपाथवर पडलों बघा. किती वेळ तसाच होतों. प्रत्येकजण माझ्याकडे बघून थांबून कांही वेळ पाहून जाई. पण एकाच्याही मनांत मला उचलण्याचें का विचारपूस करण्याचें आलें नाही. वाटे, देवा ! मी असाच का इथे मरणार ! कुणाला कशी माझी कीव येत नाही ! साऱ्यांना मजा वाटते आहे. बाई, अखेरीला देवालाच माझी कीव आली. एका तुमच्यासारख्या धर्मात्म्यानें मला गाडी करून इस्पितळांत नेऊन टाकलें. तिथे चांगला महिनाभर होतों. पण कांही केल्या बरं वाटेना. शेवटीं इस्पितळवाल्याने सांगितलें, तूं आता घरीं जा म्हणजे बरें वाटेल; म्हणून परत काकाकडे आलों. तों इथे ही दशा तुम्ही पाहतांच आहां. बाई, मी इस्पितळांत बरा होईन का हो ?" म्हणून त्याने अगदी केविलवाण्या नजरेने आमच्याकडे पाहून डोळे मिटून घेतले. तो अगदी स्वस्थ पडून राहिला. त्याला रडूं कसें तें आलेंच नाही. कसें येणार ! रडायला त्याचीं आसवें उरलीं नसावींत. परिस्थितीच्या कठोर तापाने केव्हाच तीं खाक होऊन गेलीं. पण त्यामुळेच त्याच्या नजरेंतला भयंकर हताशपणा अगदी अंतःकरणांतल्या मर्मभागांत जाऊन बोचूं लागे.

थोड्याच वेळांत आम्ही हॉस्पिटलमध्यें आलों. अलीकडे दवाखान्यांत आम्ही चांगल्याच परिचयाच्या झालेल्या होतों. आम्ही आणीत असलेल्या रोग्यांच्यामुळे तेथले नोकरचाकर किंवा नर्सेस यांना काय वाटे तें सांगतां येणें कठीण आहे. पण निदान मुख्य डॉक्टर तरी, वरवर कां असेना, आम्हांला उत्तेजन देत असे, व आमच्या कामाविषयीं पूर्ण सहानुभूति दाखवीत असे. त्यामुळे आम्ही त्याचा पुरेपूर फायदा घ्यावयाचें ठरविलें होतें.

" काय नवा रोगी आणलात ?" गर्दीत असलेल्या एका डॉक्टरने आम्हांला पाहिल्याबरोबर नमस्कार करून हसत हसत येऊन विचारलें. "हो तुम्हांला अलीकडे रोगी कमी आहेत ना; म्हणून काम आणलें आहे." मिस् रोझनी हसतच उत्तर दिलें.

खरोखर अशा वेळीं माझ्यासारखे विचार मनांत येणें म्हणजे मनाच्या कोतेपणाचें निदर्शक असेल, पण माझ्या डोक्यांत तसे विचार आल्यावाचून राहिले नाहीत खरे. समजा आम्ही (नुसत्या हिंदी स्त्रियाच) पुढे अशा रीतीने काम करीत राहिल्यास आता आमच्याविषयीं जी सहानुभूति आणि तत्परता दाखविली जाते तीच कायम राहील काय ? सध्या ठीक आहे. आमच्याबरोबर गोरी बाई आहे. आणि गोऱ्या कातड्याचा परिणाम आमच्यावर इतका नकळत होतो की तो आमचा आम्हांला सुद्धा कळत नाही. अगदी न कळतां त्यांच्याशीं आमची वागणूक बदलते. पण---

असा विचार करीत राहायला वेळ नव्हता. लगेच डॉक्टर आले. मी थोडक्यांत त्या मुलाची हकीकत डॉक्टरना सांगितली. मधून मधून तो म्हाताराही सांगत होता. अखेरीला तर त्या म्हाताऱ्याने अगदी कळवळून डॉक्टरचे पाय धरले नी सांगितलें, "महाराज याला तुमचाच समजा नी पहा. तुम्हीच त्याचे मायबाप, सारे तुम्हीच आहांत." आपल्या सारख्यांना हा देखावा अपरिचित असल्याने कसेसेंच वाटतें, पण डॉक्टरांना असला प्रकार नेहमीच सरावांतील असल्याने त्यांना कांहीच वाटत नाही. पण दरवेळीं पाय धरणारा माणूस मात्र तितक्याच उमाळ्याने पाय धरीत असतो. अशा वेळीं डॉक्टर म्हणजे यमाच्या हातून सोडवायला आलेल्या विष्णुदूतांप्रमाणें वाटतो. डॉक्टरनी आपल्या जड स्वराने त्याला आश्वासन दिलें.

त्याला हॉस्पिटलमध्ये ठेवायचा पण साऱ्या रोग्यांत ठेवणें शक्यच नव्हतें. त्याचा ताप--रोग कशा तऱ्हेचा होता याची कांही अजून कल्पना नव्हती. शिवाय सांसर्गिकही असण्याचा संभव, म्हणून

त्याला निराळें ठेवणें तर  प्तच होतें. अखेरीला भिकारखान्यांत (Pauper Ward) त्याची सोय करूं असें डॉक्टरनी सांगितल्यावर आम्ही निघून परत आमच्या कामाला गेलों.

  

संध्याकाळीं मी त्याला पाहायला गेलें. आणि खरंच सांगायचें म्हणजे मला तो भिकारखाना, त्यांतले ते रोगी, सारें बघून कसे अंगावर शहारे आले. आधीच बोलून चालून तो भिकारखाना–त्यांत उत्तम व्यवस्था असेल अशी अपेक्षा करणें म्हणजे मूर्खपणाच होय. तरी–छे–इतकी नव्हती माझी कल्पना.

खोलींत शिरल्याबरोबर घाणीने तर मला कळमळायला लागलें. सारा बिछाना घाण झाला होता. खोलींत घाण झालेली होती. त्यावर माशा किती भणभण करीत होत्या. जवळच ठेवलेल्या एका पितळेच्या घाणेरड्या तांब्यांत दूध उघडें पडलें असून त्यांत कितीएक तरी माशा पडल्या होत्या. साऱ्या खिडक्या बंद असून घाण बाहेर जायला अगदी वावच नव्हता. मग स्वच्छ हवेची नुसती झुळूक तरी कोठून येणार !

माझें मन हा सारा प्रकार पाहून किळसून गेलें. आधीच मला दवाखाने आवडत नाहीत. त्यांतून ही घाण नी ही व्यवस्था पाहिल्यावर तर विचारूंच नका.

मी हरीला हाक मारली. मला वाटलें तो निजला असेल, पण जागाच होता. क्षीण स्वरांत त्याने ओ दिली. 'कसं वाटतं रे' मी कांही तरी विचारावयाचें म्हणूनच विचारलें असावें. कारण हा प्रश्न विचारतांना माझं मलाच ओशाळल्यासारखें होत होतें. पण कांही तरी विचारायला पाहिजे ना? "बरें वाटतें का रे?" "नाही बाई, माशा फार आहेत; त्रास होतो. पोटांत अगदी कसें तरीच होत आहे."

"कांही खाल्लें नाहीस तूं?" "बाई त्यांनी दूध आणून दिलें, पण दूध नको आहे मला."

" औषध मिळालें का ?" " हो, पण तेव्हापासून जास्तच होतें आहे परसाकडेला. देवा, माझ्याच्याने अगदी उठवत नाही रे." अधिकच क्षीण होत चाललेल्या स्वरांत हरी उद्गारला.

अशा ठिकाणीं माणूस खाणार काय ? आणि बरें वाटणार कसें ? अधिकाऱ्यांकडे जाऊन ओरडा करण्यापेक्षा मी तरी काय करणार होतें ? तेव्हा आता कांही तरी करावें म्हणून मी खोलीबाहेर पडलें तों जवळच पाठीमागल्या बाजूला मृतगृह दिसलें. वा: खाशी सोय ! भिकारवाडा आधीच एकीकडे. त्यांत ही अशी व्यवस्था; आणि जवळच मृतगृह ! खरंच बांधणाराचें डोकें मोठें कल्पक असलें पाहिजे ! भिकारखान्यांतून सुटावयाचें असेल तर मृत्युगृहांत पाऊल घालणेंच सोयीचें.

मला त्या विमनस्क स्थितींत सुद्धा मृत्युगृह इतक्या जवळ पाहतांच दैवाच्या कठोर घटनेचें क्षणभर हसूं आल्याशिवाय राहिलें नाही.

शेवटीं जाऊन जितका ओरडा करतां येणें शक्य होतें तेवढा करून मी खोलीची व्यवस्था करविलीच.

" हरी आता बरें वाटतें ना ? आता थोडें दूध घे बरें. "

"बाई दूध नको मला. लिंबू द्यायला सांगा ना." जवळ असलेल्या हॉस्पिटलच्या माणसाकडे मी चटकन् पाहिलें. तो बोलला नाही. पण त्याची चर्या प्रत्यक्ष शब्दांनी वठविण्यापेक्षा कितीतरी जास्त काम करीत होती. "भिकारडे ते भिकारडे आणि चोचले किती ? लिंबू पाहिजे. कोठलं याच्या बापाने ठेवलंय !" खास मी तेथे नसतें तर त्याने हेच शब्द एखादी शिवी हासडून उच्चारले असते. गरिबांनी असले हट्ट कुठले करायचे ? कदाचित् येरवी तो मागता ना, पण सध्या गरिबी व श्रीमंती यांच्या पलीकडल्या प्रांताच्या द्वाराजवळ उभा असल्याने त्याला आठवण राहिली नसावी. मी निमूटपणें त्या माणसाला दोन आणे दिले आणि त्याला पाहिजे असलेली लिंबाची बाटली आणायला सांगितली.

" हरी, आता गुपचूप नीज बरें, तो बाटली आणून देईल ती घे. उद्या तुला बरें वाटेल अं." म्हणून मी त्याच्या अंगावरून हात

फिरविला. कोणास ठाऊक त्या पोराला काय वाटलें तें ! इतका ओझरता सुद्धा मायेचा हात त्याच्या अंगावरून कितीक वर्षांत फिरला नसावा. माझा हात त्याने आपल्या कपाळावर ठेवला आणि कांही वेळ तसाच पडून राहिला.

मला आता लिहितांना अगदी लाज वाटत आहे. पण खरें सांगावयाचें म्हणजे त्या वेळीं माझें मन द्रवून गेलें खरें, पण तेथे राहावेंसें वाटलें नाही. मनाची तितकी अजून तयारी झालीच नाही. आपण केलें तें पुष्कळ केलें, यापेक्षा आपण तरी काय करणार? अशी मनाची खोटी समजूत करून मी घरीं परत आलें. वाटेंत येतांना–स्वतःचा दुबळेपणा झाकण्याकरितां असेल–हॉस्पिटलला मी कितीक दूषणें दिलीं. केवढें मोठें हें हॉस्पिटल ! बांधण्याकरितां आणि सामानाकरितां कायसा २५–२६ लाख रुपये खर्च झाला म्हणून ऐकतें. इतके पैसे आले कोठून ? लोकांकडूनच ना ? केवढे मोठे लठ्ठ लठ्ठ पगाराचे डॉक्टर तेथे ठेवले. क्ष किरणांची सुद्धा सोय केली. पण रोग्यांची ही अवस्था. तक्रार करायला गेलों तर–पुरेशा नर्सेस नाहीत, नोकर नाहीत, आम्ही तरी काय करणार, हें उत्तर. परवा नुक्ता गव्हर्नर येऊन गेला त्याच्या स्वागताकरितां आणि कमानीकरितां कांही हजार खर्च झाले. अशा वेळीं पैसे येतात; पण जेथे जरूर आहे तेथे मात्र फंड नाहीत–अधिक पैसे खर्च करतां येत नाहीत.

  

## १७ नोव्हेंबर

आज संध्याकाळीं पुनः हरीला भेटायला गेलें. फिरून तीच अवस्था. फिरून तीच माझी ओरड. गरीब लोकांना मोफत दवाखान्याचा फायदा घ्यायला आम्ही सांगतों आणि त्यांनी घेतला नाही की त्यांच्या मूर्खपणाचें आम्हांला आश्चर्य वाटतें. सारें फुकट असून हे लोक फायदा का घेत नाहीत ? कमाल आहे यांच्या अज्ञानाची आणि हटवादीपणाची, असे उद्गार अगदी सहज निघून जातात. पण ज्यांना असें वाटेल

त्यांनी त्यांना वागवणूक कशी मिळते हें एकदा डोळे उघडन पाहावें. त्यांच्या जागीं आपण असलों तर जाऊं का, हा विचार करावा आणि मग त्यांना दोष द्यावा. तीं माणसें अडाणी हटवादी नाहीत असें नाही. आहेतच. पण त्यांच्यांतला गरिबी हा आधी केवढा मोठा दोष आहे ? त्याने त्यांच्यांतला खरा चांगुलपणा खग्रास ग्रहणाप्रमाणें काळा पडतो.

आज हरीच्या चेहेऱ्यावर जरा बरी कळा दिसत होती. काल-च्यापेक्षा जरा हुशारीही वाटते आहे असें दिसलें. पण आज त्याने अगदीच वेड्यासारखा हट्ट घेतला. काल त्याच्या शेजारीं असलेल्या दुसऱ्या खोलींत एक रोगी आणून ठेवला होता. तो आज दुपारीं मेला. तेव्हापासून त्याला सारखी भीति वाटते आहे.

" बाई, रात्रीं येथे कोणी निजत नाही. मला तहान लागते, कोणी पाणी देत नाही. बाई, तुम्ही जाऊं नका ना." मी त्याची किती समजूत घातली, पण त्याचा आपला एकच हट्ट, " बाई तुम्ही जाऊं नका. मला भारी भीति वाटते आहे. तर बाई तुम्ही जाऊं नका." मला अगदी वाईट वाटायला लागलें.

" थांब, मी कोणाला तरी तुझ्या सोबत निजायला सांगतें." म्हणून सांगून एका हॉस्पिटलच्या नोकराला थोडीशी चिरमिरी कबूल करून तेथे सोबत निजायला सांगून आलें. पण याचा आपला एकच जप "बाई, तुम्ही जाऊं नका ना." अखेरीला मी ऐकत नाहीसें पाहून तो अगदी रडायला लागला. मला सोडीना. रडतां रडतां अगदी हुंदके येऊं लागले. "बाई मला जगांत कोणी नाही हो. तुम्ही तरी मला सोडूं नका." हे शब्द ऐकून माझ्या पोटांत अगदी तुटल्यासारखें झालें.

बोर्डिंगांत असतांना किंवा एरवी सुद्धा आजारीपणांत, आपण एकटें आहोंत, आपल्याला कोणी नाही, अशी खोटी का होईना मनाची एक क्षणभर भावना झाली तर काय वाटतें; आणि आज या पोराला खरो-खरच कोणी नाही. आई नाही, बाप नाही, अगदीच कोणी नाही. आज त्याला कसें वाटत असेल ? "बाई, मला सोडून जाऊं नका ना. मला

कोणी नाही." मला त्याचे शब्द ऐकवत ना. हळूच पदरानें मी डोळे पुसून तेथेंच खुर्चीवर बसलें. मला बसलेली पाहिल्याबरोबर त्याची धडपड जरा शांत झाली. माझा हात आपल्या अंगावर ठेवून तो स्तब्ध पडून राहिला. मला सारखें रडूं येऊं लागलें. राहवेना. देवा ! आज हा प्राणी मृत्यूच्या दारीं पडून आपल्या विझत्या डोळ्यांनी जगाकडे पाहतो आहे. जगाचा निरोप घेतांना आपुलकीच्या स्पर्शाची त्याला तहान लागलेली आहे. पण त्याला काय दिसतें आहे ? अंधार ! अगदी अंधार ! आज हा मेला, गेला, कोणाला कांही परवा नाही. गाई, गुरें, जनावरें, कुत्रे, साप, यांच्या सुद्धा रक्षणाकरितां धर्माच्या नांवाने माणसें पुढे येतात. पण आज हा मनुष्य प्राणी जगांतून जातो आहे म्हणून कांही ? जगाने ह्याला केव्हाच टाकून दिलेला आहे ! पुढे अगदी विचारच करवेना. कांही कांही सुचेना. मला जास्तच रडूं येऊं लागलें.

हरीचा डोळा लागला असावा. मी चांगली तासभर तेथे बसून होतें. तेवढ्यांत तो अगदी शांत पडून होता. तो निजलासा पाहून मी त्या नोकराला तेथे बसायला सांगून घरचा रस्ता सुधारला.

  

१८ नोव्हेंबर

आज आम्हांला निरोप आला. कालच रात्रीं तो मुलगा वारला. मी पाहायला गेलें. काल जसा मी जवळ असतांना निजला होता तसाच दिसत होता—बिचारा ! सुटला जगांतून.

तेथल्या नोकराजवळ मी गेल्यावर किती वेळाने तो गेला म्हणून चौकशी केली. "बाई तुम्ही गेलां आणि अर्ध्या एक तासानें त्याने 'बाई' म्हणून एक हाक मारली आणि हात पाय झाडून पडला तो पडलाच. त्यांत त्राण होता कुठे ? तो मरायचाच होता. आम्हांला पाहिल्यापासूनच ठाऊक होतें तें."

खरंच प्रत्येक प्राणी मरायचाच असतो. पण...?

नोव्हेंबर १९३०

# निर्जीव तक्ते

वास्तविक 'इन्फन्ट मॉर्टॅलिटी'चे (बालमृत्युगणनेचे) ते तक्ते घेऊन हिंडत असतां मला असला अनुभव अगदी नवीन होता अशांतलाही प्रकार नाही. पुष्कळ वेळां कितीतरी बायकांच्या डोळ्यांना आठवणीने पाणी येई. पण किती? सारें क्षणभरच.

हिला मी नुसतें विचारलें मात्र, तुझें मूल कशाने मेलें; आणि ती जी रडूं लागली ती कांहीच्या बाहीच. मला तक्ते लवकर संपवायचे होते, मला तिचें रडूं म्हणजे कामांत मोठा व्यत्ययच वाटला. चांगली चटकन् तक्ता भरून मी मोकळी झालें असतें. तेथे आता किती वेळ घालवावा लागणार कोण जाणें, म्हणून मी खट्टूच झालें. पण आंत हे विचार चालले तरी वरून माझा पेशा निराळाच होता.

"काय झालें तुला? असें रडून कसें चालेल? मरण येणें न येणें हें आपल्या आधीनचें का आहे?" मी सांत्वन सुरू केलें.

"खरं बाई, पण मला अजून राहून राहून वाटतं की असा प्रसंग आला नसता तर कांही माझा बाळ खास जात नव्हता."

"अग, वेळ आली की मग वाचवूं म्हटलें तरी का असं माणूस कोठं वाचतं! उगीचच आपण आपल्याला रुखरूख लावून घेतों झालं."

मी व्यवहारी तत्त्वज्ञानाचा सांत्वनपर 'डोस' दिला. वास्तविक याच तत्त्वज्ञानाविरुद्ध माझी मोहीम नव्हती का? पण माझ्या त्या प्रसंगाला तोच मार्ग जवळचा होता.

तिचे हुंदके थांबले, तिने सारी हकीकत पदराने डोळे पुशीत पुशीतच मला सांगितली आणि मलाही तिची थोडीशी कीव आली. पण ती केवळ तिच्यावरच्या प्रसंगाने. खरें म्हणजे मला तिचा रागच आला. पोराच्या पोटांत डबा झाला, म्हणजे काय? डबा कसला, त्याला पुरेसें अंगावर दूध मिळालें नाही. वास्तविक मुलाला जन्माला घालून जेथे परमेश्वरानेच त्याच्या अन्नाची सोय करून ठेवली आहे तें अन्न विकण्याचा हिला काय अधिकार? आज त्या तान्हुया पोराकरितां तर तिला पैसा खर्चावा लागत नव्हता ना! कुठे बाहेर जावें लागत नव्हतें की कोणापाशीं तोंड सुद्धा वेंगाडावें लागत नव्हतें. चांगली जन्मदात्या परमेश्वराने त्याची आयती सोय केली होती–केवळ पोटाची खाई भरण्याकरितां तिने ती विकायला निघावें?

मी तिला अगदी चिडून तिरस्कारानेच विचारलें, "बाई, तुझं म्हणणं सारं खरं. आता इतकी रडतेस, पण पहिल्यांदाच तुझ्याने असं स्वतःच्या मुलाच्या तोंडचं दूध तोडून असं दुसऱ्याच्या पोराला पाजायला कसं राहवलं?"

माझ्या प्रश्नांतील तिरस्कार तिच्या अगदी जिव्हारीं भेदून गेला. "बाई, असं का बोलतां? सुखासुखी स्वतःचं लेकरू सोडून असं दुसऱ्याच्या पोराला कोण पाजील! जेव्हा मी काम धरलं तेव्हा काय मला यातना झाल्या तें एक देवाला माहीत. पर दुसरं काय करणार होतें? कांही कामधंदा करीन म्हटलं तर सारी महिनाभराची बाळांतीण व्हतें मी. पदरांत दोन चिल्लीं पिल्लीं. पोटाशीं तान्हं लेकरू. घरधनी, कसला म्येला घरधनी? त्येला बायकोच्या जिवाची कांही परवा हाय काय? रात्रंदिवस.........जाऊं द्या मेला, त्यो. मी कामाला यईना म्हणून दुसऱ्या बाईसंग निघून गेला. सांगा काय करणार होतं मी.

आणि तशांत ममईची वस्ती. कुणाच्या तोंडाकडे पाहावं, कोणापाशीं मागावं आणि अक्षी दररोज तरी आपल्यास्नी कोण देणार, हिडणार तरी किती ? धडधाकट माणसाला काम भेटेना, तिथं मला कोण पुसतो ? घरीं यावं जवळ असल नसल तेवढं पदर मोड करून खावं. दादापुता करून लोकांपाशीं पैसे मांगावं, पर लोक तरी कुठून देणार ? असा महिना सवा महिना काढला असल, पर पुढ चालेना. मी येक वेळ जेवीं, पण दोन तीन पोरं तीं भूक लागली की कुत्र्याच्या पिल्लावाणी चावचाव करूं लागत. "माये खायला देग" म्हणून रडूं लागत. ह्ये आईबाईला कीव यावी, तिनं भाकरतुकडा द्यावा; पर रोज तीन–चार पोरांना कोण देणार आणि त्यांत त्यांचं भागणार काय ?

"पोरं अशीं उपाशीं तडफडू लागलीं की माझ्या पोटांत भडभडून येई. देवा, कशाला रे जन्म दिला या जीवांना असं वाटे. येकांद्या वेळीं आसं वाटे, साऱ्या पोरास्नी घ्यावं आणि त्येंच्या सकट समिंदरांत उडी घ्यावी.

"कोणती माय अशी जित्याजिवानिशीं पोटचे गोळे तडफडतांना पाहणार ! जीव नुसता काहून गेला, तेव्हा एका शेजी बाईनं ह्ये काम सांगितलं होतं, कंधीच सांगितलं होतं, तेथं गेलें. त्यांनी माझं दूध तपासूनश्येनी पाहिलं. लई फक्कड दूध असं डॉक्टर बोलला. त्येना मी माझं मूल मेलं असं खोटंच सांगितलं आणि काम धरलं. जेऊन खाऊन दहा रुपये द्येत. म्हटलं तेवढंच. पोरं उपाशी तरी मरायला नकोत. बाई, जीव असा काहून गेला होता.—माझ्या बाळाकडे पाहिलं न्हाई की कांही न्हाई. कशी पहाणार, तो काय रडे रडे व गप्प बसे. अफूचा गोळा दिला की गप्प. पण हीं कारटीं कुठलीं गप्प बसायाला. त्यांना सारं कळे, सांगतां येई; भूक लागल्याचं समजे आणि तीं जवां भूक भूक करून रडूं लागत तवा पोटांतलीं आतडीं अशीं अशीं तुटूं लागत. माझा तान्हा बाळ मुका जीव त्यो बोलत तरी नसं, पर बाकीचीं तिघं भूक भूक करून आरडूं लागलीं की वाटं काय कसं करूं,

चोरी करूं की कोणाला फाडूं, नी यांना खायला घालूं. बाई, गरिबांना देव पोरं कशाला देतो? न्हाई खायला, न्हाई प्यायला. देवाचे जीव जन्माला यावे आन किडामुंगीवाणी पटापट मरून जावे. बाई, त्यांची उपासमार जित्या डोळ्यांनी पाहवेना. कशींबशीं त्ये दहा रुपयान्सी त्यांना गप्प बसवलें, मनांत आलं बाळाचं पाहून घेऊं. पर ती पारशीण मोठी द्वाड, दिवसभर घरीं येऊं देत नसे. माझ्या बाळाला मी एकदा पहाटे पाजीं त्यावर बाकी सारा वेळ त्याला कांही नसे. आणि जें लागे ते दोन पेजेचे चमचे शेजीबाई घाली."

"एवढें मूल आणि त्याला पिठाची पेज!" मी असें अखेर विचारलेंच. "हो तर. त्यांत काय बाई? तुम्हांस्नी दूध, पण आमच्या गरीब लोकांत कुठलं दूध भेटणार? असलं तर मातेचं नाही तर धरित्रीचं. किती जण तरी पेजच घालतात. त्याचे पलीकडला पोरगा आगाशींत खेळतोयना, तो असाच वाढलेला." असें म्हणून तिने गणपतीसारखें पोट वाढलेलें, हातपायांच्या काड्या असलेलें एक मूल खेळत होतें तिकडे बोट केलें. त्या मुलाची मूर्ति खात्री पटविण्यास पुरेशी होती.

"बाई, तुम्हांला वाटतं पण गरिबाचं हें असंच हाय. मला पेजेचं न्हाई इत्कं वाटत, पर—माझ्या लेकराचं दूध दुसऱ्याच्या लेकराला पाजलं आणि माझ्या हातांत......" असें म्हणन ती फिरून दैवाला हात लावून रडूं लागली.

तिची हकीकत ऐकून दुःखाच्या देखाव्याला सरावलेलें माझें मन सुद्धा विरघळूं लागलें. खरेंच या बाईच्या परिस्थितींत मी काय केलें असतें? कामधंदा नाही, अशीं दोनतीन मुलें अंगावर नुसतीं तोडून खाताहेत, अशा वेळीं कोण कसला विचार करणार? विचार एकच. जगायचें. एवढ्याशा लहान मुलाला पेज देणें वाईट असेल, पण आवतीभोवती सारेंजण तेंच करीत असतां मला त्यांत वावगें कसें वाटावें? कदाचित् इतक्या असहाय परिस्थितींत चांगल्या शिकल्यासवरल्यापणीं

सुद्धा मी मुलाला अफू दिली असती, पेज पाजली असती. मग ही बाई तर बोलूनचालून अडाणी. माझे हे विचार चालूच होते. मात्र नेहमीच्या सवयीप्रमाणें तक्त्याचीं सारीं सदरें भराभर लिहीत होतें. मुलाचा जन्म केव्हा झाला, कोठे झाला. मृत्यु, वय, कारण; एकाएकी माझी पेन्सिल अडखळली. कारण ! कारण काय लिहूं, पोटांत डबा झाला. पण डबा कां ? पिठाची पेज पाजली गेली म्हणून. पण ती कां ? कोणी तरी आंत सतावून विचारूं लागलें. पिठाची कांजी पाजल्या-कारणाने पोटांत डबा, मी कंसांत स्पष्टीकरण लिहिलें. पण समाधान होईना. माझ्या या स्पष्टीकरणाने काय होणार ? हे निर्जीव तक्ते यापेक्षा अधिक सजीव कसे होणार ? उद्या या सर्व कागदांवरून कार-कून बसवून आकड्यांचें कोष्टक तयार केलें जाईल. हिंदुस्थानांत इतकीं लहान मुलें मरतात. त्यांतलीं डब्याने इतकीं मरतात. डबा होण्याचीं कारणें, असें म्हणून त्याखाली, अफू, पिठाची कांजी, अज्ञानामुळे आबाळ वगैरे सारें भारूड दिलें जाईल. अगदी निर्विकार मनाने हा अहवाल प्रसिद्ध होईल. पण त्या वेळीं कदाचित् यांतील प्रत्येक मृत्यूपाठीमागें उभा असलेला हा इतिहास कोण बोलणार ? कोणाच्या हें लक्षांत तरी येईल काय ? जग हिंदुस्थानची कीव करील. शहाणे लोक उप-योजना सुरू करतील. डॉक्टर कमिट्या बसवतील. म्युनिसिपालट्या बालमृत्युसंख्या कमी करण्याकरितां निरनिराळी उपाययोजना अंमलांत आणतील.

ही सारी दरिद्री जीवनाची थट्टा नव्हे तर काय ?

नोव्हेंबर १९३३

# जुगाराचा पहिला धडा

आज जर मला तेथे कोणी पाहिलें असतें, तर खास त्याला गंमत वाटल्यावाचून राहिली नसती. माझी मलासुद्धा गंमत वाटत होती ती! चार पांच मुलें, हातांत पत्ते आणि एका पडक्या खोलींत मोठ्या माणसांच्या दृष्टीआड चाललेला आमचा खेळ! मला अगदी लहानपणचेच दिवस आठवले! मी प्रथम तेथे गेलें तेव्हा मला पाहिल्याबरोबर चटकन् सारीं मुलें गप्प बसलीं, खेळही थांबला. पण मला आज कांही त्यांचा खेळ थांबवायचा नव्हता. त्या रहस्याची दीक्षा घ्यावयाची होती.

"कायरे खेळतां ?"

"कांही नाही, बाई, पत्ते." मुलांनी खाली माना घालून खोल चोरट्या आवाजांतच उत्तर दिलें. त्यावरूनच वास्तविक मी त्यांचा खेळ उमगलें होतें. पण राहवेना म्हणून प्रश्न केलाच. "कांही पैसे बिसे लावून खेळतां की नाही ? का तसेंच ?" दोन तीन मुलांनी माझ्याकडे पाहिलें न पाहिल्यासारखें केलें. दोघांना मात्र मी बरोबर ताडलेलें पाहून पोरटेपणें हसूं आलेंच. "हं चालूं द्या. तूं किती पैसे मिळवलेस भिवा ? " "कांही नाही बाई. उलट या गंग्याने खोटें खेळून माझ्याकडून चार पैसे जितले."

"हां, मुळीच नाही खोटें खेळलों मी." आतापर्यंत खाली मान घालून पत्त्याशीं खेळत असलेला गंगाराम एकदम उसळला. "विचारा हवें तर भाग्याला आणि काशाला. आपण रडी खेळतो व जितलें की खोटें खेळतों असें बोलतो." म्हणून गंगारामाने नुसत्या शब्दांनी व अविर्भावाने जेवढें दबकावणें शक्य आहे तेवढा भिवाला दबकावलाच. बरें मी तेथे होतें म्हणून, नाहीं तर एवढ्या शब्दांनीच भांडण न राहतां सहज गुद्दागुद्दीला सुरुवात झाली असती.

"कसेंरे खेळतां तुम्ही ? खेळा पाहूं ?" हळू हळू नाखुषीनें त्यांचा डाव सुरू झाला, पण माझ्यादेखत पत्त्यांना रंग चढेना.

एखाद्या आगंतुक माणसाने उगीचच बारकाईने आपल्याकडे पाहिलें म्हणजे जशी एक प्रकारची स्वतःविषयीं जाणीव उत्पन्न होऊन आपण स्वतःला विसरूं शकत नाही तशांतलाच प्रकार झाला. "तें कांही उपयोगी नाही," मी मनाशीं विचार केला. ह्यांच्यांत शिरलेंच पाहिजे. चोर होऊनच चोराची विद्या काढावी लागते.

"कायरे, मला शिकवतां का तुमचा खेळ. मला पत्ते येतात, पण साधे. असें तुमच्यासारखें नाही खेळतां येत."

माझ्या शब्दासरशीं तीं मुलें माझ्याकडे पाहूं लागलीं. प्रथम त्यांना माझ्या शब्दांची खात्री पटेना, पण ेव्हा मी अगदी खरीच तयार आहें, अशी त्यांची खात्री झाली, त्यासरशीं सारें वातावरण एकदम बदललें. वातावरणांतील दाब नाहीसा होऊन पूर्वीचा मोकळ-पणा दिसूं लागला.

साऱ्यांना मी खेळणार म्हणजे खरीच गंमत असें वाटून हसूं येऊं लागलें. मीही हळूच माझ्या नव्या दीक्षेकरितां सज्ज होण्यासाठी माझी छत्री बंदी खाली ठेवून दगडावर बसलें.

"हां, आता खरंच बाई खेळणार !" साशंक असलेला एकजण उद्गारला. हळूहळू एकएक वीर मला शिकवायला पुढे सरसावूं लागले. आज बाईंना कांही येत नाही तें आपल्याला येतें आहे ही

जाणीव सर्वांच्या तोंडावर मोठ्या मजेने चित्रित झाली होती.

पत्त्यांची वाटणी झाली. प्रत्येकाने दोन दोन पैसे खाली ठेवले. भिवापाशीं पैसे नव्हते ते गंगारामाने उसने दिले. मी कांहीच ठेवलें नव्हतें. "बाई आधी दोन पैसे काढून ठेवायला लागतात खाली, तर मग खेळ." "मजजवळ तर पैसे नाहीत." मी म्हटलें. खरोखरच मजजवळ पैसे नव्हते. "मग ?" काश्या उद्‌गारला. मी खरोखर खेळणार की नाही ? फिरून त्यांना शंका आली. मलाही जरा बरें वाटलें नाही. "दुसरें नाही का कांही चालणार ?" मी प्रश्न केला. मला खेळाचा विरस व्हायला नको होता. "हो हो चालेल तर !" माझ्या फाउन्टन पेनकडे दृष्टि टाकीत भाग्या हळूच बोलला. गंगाराम त्याच्याही पुढे जाऊन म्हणतो, "खरंच बाई तुमचें तें फाउन्टनपेन ठेवा." मी अगदी निमूटपणें फाउन्टनपेन खाली काढून ठेवलें. "मी हरलें तर हें फाउन्टनपेन तुमच्या जवळ असूं द्या. मी तुमचे दोन पैसे उद्या आणून देईन."

आमच्या अटी कबूल झाल्या व आमचा खेळही सुरू झाला. निकाल काय व्हायचा तें मला माहीतच होतें. त्यांच्या पत्त्यांच्या खाणाखुणा. शिवाय नेहमी खेळण्याचा सराव, एवढें असल्यावर मला हारवायला कितीसा वेळ लागणार होता ! दोन पैसे हारल्यावर मला आणखी हारायची इच्छाही नव्हती. व माझें कामही झालें होतें. सुदैवाने एवढ्यांत आमच्या मोटरचा आवाज ऐकूं आला. तेव्हा आम्हांला उठावें लागलेंच. मुलांची मात्र आणखी मला हारवायला मिळालें नाही म्हणून थोडीशी निराशा झाली. "काय बाई तुम्ही आणखी बसत नाही; नाही तर आज तुम्हांला आणखी चांगलेंच जितलें असतें." असें कुरकुरत ते सारेजण उठले. आता फाउन्टनपेन द्यावयाचें. फाउन्टनपेन त्यांच्याजवळ ठेवणें म्हणजे शुद्ध माकडांच्या हातांत देणेंच होतें तें. माझा जीव अगदी खालवर होऊं लागला. "हें घ्या फाउन्टनपेन—पण उघडायचें मुळीच नाही अं." असें म्हणून मी फाउन्टनपेन देऊं लागलें. पण एवढ्यांतच माझ्या पेनचे दिवस भरले

नव्हते म्हणून म्हणा, की कांही म्हणा, त्यांच्या आपाआपसांतच पेन कोणी ठेवायचें, याबद्दल लठ्ठालठ्ठी सुरू झाली.

भिवा म्हणे मी ठेवीन. गंगाराम म्हणे मी ठेवीन, काश्या म्हणे मग मीच का नको! शेवटीं आपल्याला मिळण्याचा कांही योग नाही, हें पाहून भाग्या शिष्टपणाचा आव आणून सांगूं लागला, "बाई, या पोरांच्याजवळ कसलें देतां तुम्ही तुमचें पेन! खास हे उघडतील आणि मोडून टाकतील. तुम्ही आपलें घेऊनच जा कसें!"

मला नाही तर कोणालाच नको ही सूचना साऱ्यांना पटकन् पटली. "हो बाई, तुम्ही आपलें घेऊन जा कसें, उद्या मात्र पैसे जरूर आणा अं." माझ्या पेनवी सुटका झालेली पाहून मला बरें वाटलें. आणि मी पैसे आणण्याचें कबूल करून निघालेंच.

एकूण आज मी चोहोकडे उघडया चोरटया स्वरूपांत चालू असलेल्या जुगारीचा पहिला धडा घेतला अं!

आजच्या या साऱ्या प्रकाराची आठवण झाली की अजून हसूं येतें. मी फाउन्टनपेन लावलें कसें, खेळलें काय, सारीच गंमत खरी! पण त्यामुळे मला किती गोष्टी कळल्या, त्या एरवीं कळल्या असत्या की नसत्या कोण जाणे!

  

अफूचे गोळे लहानपणापासून चढवून जसें अगदी अजाणपणापासून मुलांना गुंगींत राहण्याचें वळण देण्यांत येतें तसेंच जुगारीचें नाही काय? दारिद्र्याने पीडलेले, कफल्लक झालेले, पैसे असलेले, पैसे नसलेले, सारे लोक निरनिराळ्या तऱ्हेने जुगार खेळतांना येथे दृष्टीस पडतात! एक दिवस तर मी सकाळीं सातला गेलें असतां जो कांही मनुष्यांचा अड्डा बसलेला पाहिला तो संध्याकाळीं सातपर्यंत तेथे तसाच होता. एक गेला की दुसरा येई, पण त्यांतले कांही बहाद्दर अशी मेख मारून बसलेले होते, की त्यांना उठावें लागलें तेव्हाच काय ते उठले असतील. खेळतां खेळतां सोंगटयांत जशी जिद्द लागते, तसाच एक

प्रकारचा कैफ यांत चढत असला पाहिजे. त्याशिवाय माणूस हरत असतांना सुद्धा ईर्षेला पेटून आणखी हट्टाने बसून राहणार नाही. त्या खेळणाऱ्या लोकांकडे पाहिलें की जुगारसुद्धा मादक आहे हें म्हणणें पटायला लागतें. पण या मोठ्या मनुष्यांच्या गोष्टी मी किती झालें तरी दुरून पाहणार. फार झालें तर त्यांच्या बायकांना विचारणार. पण त्यांच्यांत शिरून कांही प्रत्यक्ष कळणें मला शक्यच नव्हतें. आज या मुलांबरोबर मिसळून कितीक तरी माहिती सहज मिळाली. त्यांना असलेली सारी माहिती ऐकली की वाटूं लागतें, खरोखर मोठ्या माणसांना लहान मुलांची कल्पना नाही. लहान मुलांना त्यांना काय कळतें म्हणून नेहमी आपण त्यांच्याकडे दुर्लक्ष करतों. पण एखाद्या पहारेवाल्याच्या नजरेने आपली सारी कृति मुलें लक्षपूर्वक पाहून मनांत साठवीत असतात.

माझी कल्पना होती निदान बायकांना तरी हें व्यसन आवडत नसावें. आईला तरी निदान असला नाद मुलाला लागलेला पाहतांच धक्का बसावा. पण मुलांना विचारतां माझी सारी कल्पना कविकल्पनेइतकीच फोल ठरली. आज त्यांच्या अड्ड्यावर गेल्यानंतर मी भाग्याला विचारलें, "कायरे, तुझी आई मारीत नाही का तुला असे पत्ते खेळतांना पाहिलें म्हणजे?" भाग्याने जरा उत्तर द्यायचें टाळलें. पण साऱ्यांचीच कांही तशी स्थिति नव्हती. मी त्यांच्या खेळांत भाग घेतल्याने त्यांच्या माझ्यामध्ये एक प्रकारचा मोकळेपणा उत्पन्न झाला होता. शेवटीं दिलें चौघांनी सांगून, "बाई, आम्ही कधी आईला सांगतच नाही. ती मिळालेले पैसे सारखे मागत सुटते आणि दिले नाही तर मारते. पैसे जितले म्हणजे नाही ठोकीत. पण तिला मिळालेल्यांपैकी कांही तरी द्यावें लागतें." आहे की नाही छान वळण!! जोंपर्यंत हातांत कांही येतें आहे तोंपर्यंत तें कोणत्या कशा मार्गाने येतें याचा विचार न करतां, हरले म्हणजे मात्र 'पत्ते खेळतोस नाही का?' म्हणून तोंडाचा पट्टा व हाताचा सपाटा वळण लावण्याकरितां सुरू करावयाचा! मातेकडून मिळणाऱ्या या

वळणाचा मुलांच्यावर होणारा सुपरिणाम अशा उत्तरांत दिसतच असतो. पैशाच्या लालचीने घरचीं माणसेंच न कळतां अशा प्रकाराला उत्तेजन देत असतात !

मी नंतर हळूच विचारलें, "कायरे तुम्हांला पैसे तरी कुठून मिळतात ? का हळूच घेतां पेटींतील काढून ?" माझा प्रश्न संपला सुद्धा नाही तोंच तिघे एकदम ओरडले, "बाई, हा-हा-हा काशा काढतो हळूच आईच्या पेटींतून. आम्ही नाही—बाई, आम्ही नाही. आईबाप कामाला गेले की हा हळूच किल्ली लागूं करतो नी घेतो काढून." काश्याच्या वरच्या या आरोपाला दुसरा पुरावा नकोच होता. त्याचा तो ओशाळलेला चेहेरा अगदी निमूटपणें साक्ष देत होता.

"पण मला सांगा तुम्ही कुठून आणतां पैसे ?" "एकाद दिवस कुठे दोनचार आण्यांचें काम मिळालें की ठेवतों आम्ही त्यांतले थोडे आमच्याजवळ. नाहीतर तो मारुतीच्या पारापाशीं पिंपळाच्या झाडा-जवळ एक पठाण नाही का राहात, तो देतो पैसे. दोन काढावे आणि मिळाले का तीन द्यावे म्हणजे झालें ! सारीं मोठीं माणसें पैसे नसले की त्याच्याजवळूनच काढतात. पण आम्ही फार वेळां नाही काढीत बाई. तो उंच उंच टांगेल्या शंकऱ्या आहेना, त्याला पठाणाचे चार आणे द्यायचे आहेत." आणखी किती तरी मुलांचीं त्यांनी नांवें सांगितलीं पण त्यांची रक्कम चार आणे एवढी मोठी नव्हती. आमचा हा संवाद चालू असतांच एक पैसा मी हरलें. त्या वेळीं 'बाई हरल्या' म्हणून विजयानंदाने त्यांनी जो ओरडा केला तो अझून मला डोळ्यासमोर दिसतो आहे. "चला बाई एक पैसा तुमच्यावर लागला." म्हणून अगदी सारे हुरळून गेल्यासारखे ओरडूं लागले. फिरून डाव सुरू झाला व त्याबरोबर माझे प्रश्नही हळूच सुरू झाले. खेळतांना माझें लक्ष खेळा-पेक्षा माहितीकडे आहे अशी त्यांची कल्पना नव्हती.

खेळाच्या डावांतले इतर प्रश्न तसेच ते. आणि तेसुद्धा बाईंना माहीत नाहीत म्हणून मोठ्या डौलाने सारी माहिती मला सांगत होते.

"कायरे, तुम्हांला खेळतांना एकाद्या ोलीस शिपायाने पाहिलें तर !"

"हात्याच्या शिपाई !" तुच्छतेने सारेच एकदम हसले. "शिपाई !— शिपाई तर मोठ्या माणसांत बसून खेळतात सुद्धा. आणि तेवढीच वेळ आली तर त्याला पानविडीला पैसे दिले की झालें ! आम्ही तर कांहीच देत नाही. आम्ही जातों पळून. मग नाही येत तो आमच्या पाठीशीं. पण मोठीं माणसें मात्र देतात पैसे !"

मला आश्चर्य वाटे, इतक्या उघड्यावर राजरोस जुगार चालला असतां पोलिसांचें लक्ष कसें जात नाही ? पण त्यांतील पानविडीचें इंगित कोठे होतें मला माहीत ? तें कळल्यावर सारा उलगडा झाला. जेथे राखणदारच सामील तेथे चोरी उमगावी कशी !

"कायरे हे पैसे मिळाल्यावर तुम्ही काय करतां ?"

"काय वाटेल तें करतों. कधी भजीं खातों, कधी चित्रें घेतों."

"बाई, माझ्याजवळ एक सिनेमा आहे तीन आण्यांचा ! त्यांतून किती छान दिसतें !" भिवाने मोठ्या डौलाने सांगितलें व मग हळूच म्हणतो, "गंग्या आणि रामा दोघे तमाशाला जातात हो !"

"हो बाई, हो. हे दोघे जातात, आम्ही नाही जात." काशाने पण पुष्टि दिली.

गंगाराम कांही न बोलतां पत्त्याकडेच पाहत होता तो एकदम उसळला "मग तुम्ही नाही जात कां सिनेमाला ?" एवढें झाल्यावर आमचा खेळ मी जाईपर्यंत चांगला व्यवस्थित चालला होता.

  

झालें. सारी मजा वाटली ! गंमत झाली खरी ! पण विचार करतां करतां मन मात्र काय सांगतें आहे ? येथे वाढणाऱ्या मुलांना लहानपणापासून काय हें बाळकडू ! आमच्या घरांत लहानपणीं अपशब्द सुद्धा कानीं पडूं नये इतकी काळजी घेण्यांत येई आणि येथे मुलाला कळा-यला लागल्यापासून चांगलें वळण तर बाजूलाच राहिलें पण दुर्वळण

मात्र भरपूर. लहानपणापासून मोठीं होईपर्यन्त अगदी पक्कीं मुरून निघतात. जुगार, दारू व इतर अनीतीचे प्रकार राजरोस मुलांच्या देखत घडत असतात. त्यांत कांही अस्वाभाविक आहे असें मुलांच्या मनांत सुद्धा आलें नसतें. पण या गोष्टी वाईट आहेत ही जाणीव मोठ्या माणसांकडून कधी कधी करुन देण्यांत येते तेवढीच. पण हें वाईट कोठपर्यंत ? लहानपण आहे तोंपर्यत. लहानपणीं तेवढें असें करायचें नाही. पण मोठें झालें की याच वाईट गोष्टी करण्याचा सदर परवाना मिळाला, अशी जर लहान मुलांची समजूत झाली तर त्यांत नवल तें कोणतें ? नशीब हें की अशा परिस्थितींत वाढून सुद्धा चांगल्याची जाणीव राहते. मुलांना वाईट म्हणतांना आपण वाईट करतों हें पक्कें कळतें. मात्र ती जाणीव तीव्र असूं शकत नाही.

आज हीं मुलें चोरून मारून पडक्या भिंतीआड खेळत आहेत. उद्या मोठीं झालीं की असा आडपडदा न ठेवतां उघड खेळूं लागतील, मोठ्या रकमा लावूं लागतील; खरोखर या पुढच्या तयारीकरितां आज तीं एव्हापासून सज्ज आहेत. अशा वेळीं यांतलीं कितीएक जुगारीपायीं देशोधडीला लागलीं तर नवल तें काय ?

जुगार ! लहानपणापासून मोठेपणापर्यंत साऱ्या आयुष्याची जुगारच नाही कां ? आणि कां तर एकदम पैसे मिळविण्याची हाव–अनायासें पैसे मिळविण्याची हाव. याच हावेने हींच मुलें शर्यतीच्या मैदानाभोवती घिरट्या घालतील, नाना ठिकाणीं जातील, मोहक स्वरूपाने जुगार चोहोकडे त्यांना गिळायलाच बसलेली आहे.

फेब्रुवारी १९३१

दृश्य सहावें

# माझें कोरडें तत्वज्ञान

मी प्रथम त्या खोलींत शिरलें तेव्हाच त्या माणसाला दाराशीं बसलेला पाहिला होता, आणि त्या वेळींच त्याची चर्या मला मुळीच आवडली नव्हती. पूर्वीसारखी भित्री असतें तर मी त्याच्या आसपास राहण्याचें सुद्धा धारिष्ट केलें नसतें, इतका तीव्र कडवटपणा त्याच्या नजरेंत भरून ओसंडत होता. वाऱ्यावादळांनी विशीर्ण झालेलें घर पाहिलें की फक्त त्याच्या मोडकेपणाचीच कल्पना येते, पण त्याच घरांतून वाऱ्याचे भेसूर आवाज येऊं लागले व घुबडें घुमतांना ऐकलीं म्हणजे भीति वाटूं लागते.

मी आंत शिरलें. माझ्या नेहमीच्या सवयीप्रमाणें त्या बायकांना किती तरी गोष्टी सागितल्या. त्याचें त्यांना कांहीसुद्धा वाईट वाटलें नाही. केवळ माझ्या समजुतीखातर कां असेना पण त्यांनी खोली स्वच्छ करण्याचा प्रयत्न केला, आणि खरंच भाकरीचे तुकडे, कपडे, घाण इत्यादि गेल्याने खोली किती बरी दिसूं लागली ! मी त्यांचा त्यांना फरक दाखवला. माझें मलाही बरें वाटलें. आणि "बघ उद्या अशीच खोली ठेव. मी पाहायला येईन." असें म्हणून त्या बाईची पाठ थोपटून मी बाहेर येणार इतक्यांत हा मनुष्य आंत आला. खरें म्हणजे

मी त्याला टाळूंच पाहत होतें. पण त्याने सरळ माझ्याशींच बोलायला सुरुवात केल्याने टाळणें शक्य नव्हतें.

"बाई, तुम्ही म्हणतां, तें सारं खरं. आम्हांला सुद्धा कळतें. आम्हांला चांगलं राहावंसं वाटत नाही काय? पण पैसा कुठला आणायचा?" मला हें वाक्य नित्य परिचयाचें झालें होतें. त्याच्यावर मी नित्याचेंच उत्तर दिलें, "पैसा लागतो का खोली झाडायला? नीट कपडा ठेवायला पैसा लागतो, का पोरांना आंघोळी घालायला पैसा लागतो?" मी माझें शस्त्र काढलें.

"तें खरें बाई, तुम्हांला नाही त्याची कल्पना यावयाची."

"कल्पना नाही यावयाची म्हणजे काय?" मी जरा तिरिमिरी-नेच विचारलें.

"बाई, त्याला आमच्यासारखा पोटाला चिमटा बसावा लागतो. आज वेळ गेली, उद्या काय करावयाचं हा विचार पडावा लागतो. आज दाणेवाला आला, उद्या पठाण आला, तर त्याला चुकवावें कसें याची जाचणी असावी लागते, आणि मग या गोष्टींना पैसा लागत नसला, तरी असं कां होतं तें कळतं." मला त्याच्या बोलण्यांतील सत्य पटत नव्हतें असें नाही. मी सुद्धा किती वेळां म्हटलेलें नाही कां, की मी त्यांच्या स्थितींत असतें, तर त्यांच्यासारखीच खास ताडी पिण्यास गेलें असतें! पण मला जरी कळत असलें तरी आज त्याने सांगितलें तें बरें वाटलें नाही.

एखादे वेळीं उलट खाऊन माझें मन मलाच विचारूं लागतें, —तुला असें जाऊन या लोकांना सांगण्याचा काय अधिकार? केवळ ते ऐकून घेतात म्हणूनच ना? उद्या श्रीमंत वर्गांत जाऊन त्यांना त्यांचे असे दोष सांग पाहूं. त्यांच्यांत काय दोष नाहीत? त्यांना सुधारण्याजोगें असें कांही उरलें नाही काय? खास आहे. आणि

पुष्कळ आहे. पण त्यांच्यांत जाऊन नाही तूं काम करीत ? छे, श्रीमंत, सुशिक्षित वर्गांत जाऊन 'सोशल वर्क' करण्याची कल्पना सुद्धा तुला हास्यास्पद वाटते. आणि याला कारण एकच. ते तुला तुझ्या बरोबरीचे वाटतात. तुझ्यावरचे वाटतात. त्यांच्यांत दोष असतील तर ते नाइलाजास्तव राहिले आहेत, असें तुला वाटतें. त्याबद्दल तूं त्यांना दोषी धरीत नाहीस. त्या वेळीं समाजाला दोषी धरतेस, समाजरचना चूक ठरवतेस; पण या चाळींतून सांगतांना–?

त्याचें बोलणें चालूच होतें, "तुमच्या नवऱ्याला माझ्यासारखा चार वर्स कामावाचून राहण्याचा प्रसंग येऊं द्या, मग बघा तुम्ही अशाच राहतां का. आणि बाई, तुम्ही हिची गोष्ट सोडून द्या. ही पहिलेपासूनच अशो गबाळ आहे. पण मी आता तुम्हांला दिसतों असा नव्हतों. माझी अशी शान होती, की लोकांना वाटावं की मास्तरच हाय् जणूं. महिन्याला अक्षी सत्तर रुपये मिळत होते कारखान्यांत. बाई, तेव्हा यायचं होतत, नी बघायचं होतत माझं घर. आता काय बघतां ?

"दिवसामागून दिवस चालले. आज चार वर्सं सारखा अस्सा बसून आहें ! ह्या हातानं वीस तोळं सोनं मोडून खाल्लं. पहिल्यांदा हलकीं कामं आलीं की वाटे कमी पगार घेऊन आपली किंमत का कमी करा ? आपलं काय, काम लागलं की जाऊं. पण महिना गेला, चार महिने गेले, कामाचं चिन्ह दिसेना. इकडे टंचाई भासूं लागली. चार वर्षं ह्या पठ्ठ्याने मुंबईत हिंडूनशानी काम मिळवायचा प्रयत्न केला हाय. वीस पंचवीस रुपये भराव तवा कुठं एखाद दुसरं काम लागलं तर लागावं, पर तेंही खलास महिना दो महिन्यांत. सांगा कसे दिवस काढावे ?

"गेल्या महिन्या दोन महिन्यांत तर अक्षी पायाचे तुकडे केले वणवण हिंडून ! पंधरा रुपये घ्यायला कबूल झालों, पर काम कुठं भेटेना. आणि गाठीशीं तर पैसा नाही. लोकापाशीं उसनं तरी किती

दिवस मागावं ? उद्या भाडेवाला येईल, भाडं चुकविलं नाही की घराला टाळा लावून जाईल. कुठलं आणूं भाडं ? देतां नोकरी लावून ? मी सारं तुमच्या सांगण्याप्रमाणें करतों. पोटाला मिळालं की काय न झालं हें सारं सुचायला, पर तें अजून गावंना—बोला, देतां काम लावून ? "

मी त्याला काय उत्तर देणार ? त्याने आशेने माझ्याकडे पाहिलें. पण मी आज प्रत्येक चाळीतून असे शेंकडयाने बसलेले लोक पाहत होतें ! त्यांतील सगळेच कांही माझ्याजवळ भिक्षा मागत नव्हते, त्यांना फक्त कामच पाहिजे होतें. आणि तेंच तेवढें द्यायला माझ्याजवळ नव्हतें.

माझ्या मौनाने त्याला कटुसत्य सांगितलें. उदय पावत असलेली त्याची आशा नाहीशी झाली. "बाई, आमची भिकाऱ्याची जात नाही. या माहाद्याच्या सात कुळींत कोणी भीक मागून खाल्लेलं नाही. मी पैसा द्या म्हणत नाही. कपडा मागत नाही. नुसतं काम द्या म्हणून म्हणतों. आणि तें . . . तें जर देतां येत नसेल तर उगीच कशाला करतां देण्याच्या गोष्टी !

" म्हणे औषध देतों ! . . . आणि कपडे शिवायला शिकवितों ! काय करायचंय त्येला ! " असें म्हणून तो एकदम तोंड फिरवून तेथ-ल्याच पेटीवर बसला. मलाही काय बोलावें तें सुचत नव्हतें. कशी तरी सारवा—सारव करून मी निघून आलें.

खरंच, उगीच कशाला मग देण्याच्या गोष्टी. त्यांना आम्ही औषध देणार, पण त्याच्या आधी त्यांनी आजारी पडायला पाहिजे. त्यांच्या बायकांना शिवण शिकवणार, पण त्याकरितां शिवायला कपडा नको काय ? आमचे खेळायचे क्लब, आरोग्याचे नियम, स्वच्छता शिकविणें, सारें ठीक आहे ! पण काय ? ही वरची नुसती मलम-पट्टीच नव्हे काय ? मूळ कारणाला आम्ही हात घालीत नाही—नुसतें तें लक्षांत घ्यावयाला सुद्धा तयार नाही, तर काय होणार ? जेथे खायची पंचाईत, काम नाही, काम मिळण्याची आशा पण नाही, तेथे

मनाला उत्साह काय वाटणार ? जीव चटकन् जात नाही म्हणून कसें तरी जगायचें; तेथे कसल्या आल्या आहेत इतर गोष्टी ?

आज आला, अशा प्रकारचे अनुभव आले की आधीच दुबळी असलेली माझी कार्यावरची श्रद्धा अधिकच ढासळूं लागते. मी जातें आहे तो मार्ग बरोबर आहे की नाही, याची शंका उत्पन्न होते. नव्हे–आपण बरें करण्याच्या मिषाने उलट कांही भलतेंच तर करीत नाही ना अशीही भीति मनाला डवचूं लागते. आणि मग हा ध्येयवाद–कार्यावरचा विश्वास, पाया डळमळीत असलेल्या इमारतीप्रमाणे खचून जाऊन उलथून पडतो की काय असें वाटूं लागतें.

आक्टोबर १९३२

दृश्य सातवें

# गिरणींतून आल्यावर

वास्तविक मी गिरणींत नाही. दिवसभराचा सारा शीण फेकून देऊन चांगली आरामखुर्चीवर पडलें आहें. पण मनुष्याच्या कल्पकतेनें, बुद्धिवैभवाने गाइलेल्या त्या संगीताचे सूर मात्र अजून माझ्या कानांत तसेच घुमत आहेत. त्यांत मार्दव नाही, मनाला विरघळून टाकणारा कोमलपणा नाही, सुरांची खालवर फिरकती फेक नाही की नुसती साधी विविधता सुद्धा नाही. कर्णकठोर कंटाळवाण्या एकाच सुरांत तें संगीत सारखें चालू आहे. पण कांही असो, ज्याने ह्या दिंडीदरवाजाच्या आंत पाऊल टाकून तेथला सारा देखावा डोळे भरून पाहिला असेल त्याला खेचून धरण्याचें सामर्थ्य मात्र त्यांत आहे खास !

वास्तविक, या गिरणीवरून मी कितीदा गेलें असेन. मोटारीने गेलें आहें, पायीं गेलें आहें. त्याच्या सकाळीं ७ वाजतां होण्याऱ्या भोंग्यावरून माझें बंद पडलेलें घड्याळ पण मी कितीकदा तरी लावलें आहे पण उंचच उंच दिसणाऱ्या चिमणीशिवाय माझें लक्ष तिच्याकडे कधीच वेधलें नाही. मात्र आगगाडींतून येऊं लागलें की त्यांतील काचेच्या छपरावर जेव्हा सायंसूर्याचे किरण पडून सोनेरी तेजाने तें सबंध कौलार भोवतालच्या हिरवळींत चमकूं लागे, तेव्हा मात्र अनेकदा

त्या गिरणीकडे हेव्याने पाहीं. एकदा त्याच्या दिंडीदरवाजाजवळ असणाऱ्या गुलमोहोराचा वृक्ष असाच बहरून आला असतां एके दिवशीं एका आंतून बाहेर येणाऱ्या इसमाला येथे काय आहे म्हणून विचारण्याची मला इच्छा झाली. त्याने ती गिरण म्हणून सांगितलें. पण मला तें आवडलें नाही. चिमणीवरील 'गुलमोहर' हें रंगविलेलें नांवच मला अधिक पसंत पडलें. आणि कां कोण जाणे, आंतील अदृश्य प्रदेशाचा मी गुलमोहोराच्या वृक्षाशींच संबंध जोडूं लागलें. तें गिरणीचें आवार आहे हें मला माहीत होतें. गिरणीकामगारांच्या गिरणींतील आयुष्याची अंधुक कल्पना पण मला होती; पण तीं सारीं कल्पनाचित्रें गुलमोहोर वृक्षाच्या धाग्यादोऱ्यांनी, सायंसूर्याच्या सोनेरी किरणांनी उजाळलेल्या पार्श्वभूमीवर भरलेलीं होतीं. बाकी माझ्या परिस्थितींत असलेल्या किती बायकांना—नव्हे पुरुषांना सुद्धा—उद्योगयुगांतील या अद्भुत यंत्रसंगीताची पुरी कल्पना आहे ? रात्रंदिवस त्या रस्त्याने जाऊनही आमच्यांत आणि गिरणींत आवाराची प्रचंड भिंत उभी आहे. तिचा दरवाजाही तितकाच प्रचंड व पूर्ण अबोल असा आहे. एखादे वेळीं बाजूच्या लहान फाटकांतून आंतला कांही भाग दिसलाच, तर तो म्हणजे मुंबईच्या वस्तीला कधी न दिसणारें मोकळें अंगण, त्यांत रस्त्याच्या रांगेने असलेलीं तीं आंब्याचीं झाडें व त्यापलीकडे तिरप्या तिरप्या छपराच्या काचेच्या कौलारांनी चमकणाऱ्या इमारती. आंतील दृश्याची—चमत्काराची—आमची हीच कल्पना; म्हणूनच मी व मिस् रोज, आवारांत शिरून मॅनेजरच्या ऑफिसाशीं पोचेपर्यंत अगदी एका निराळ्या अपरिचित प्रदेशांत पाऊल टाकल्यासारखें मला वाटत होतें. आमची मोटर मॅनेजरच्या आफिसपाशीं थांबली. आम्हांला शिपायाने आंत बसण्यास सांगितलें. पण तो ऑफिसाचा थाट पाहून वरून पंख्याचा वारा चालू असतांही माझा विरस झाला. अगदी सरळ साध्या शब्दांत सांगायचें म्हणजे एवढ्या मोठ्या गिरणीच्या मॅनेजरचें तें ऑफिस असें मुळीच शोभण्यासारखें नव्हतें. तेथली भिंत, कागद-

पत्रांचे गठ्ठे, सारे शेतांत राबणाऱ्या रानवट मुलीइतके राकट व धुळीने भरलेले होते.

मॅनेजर साहेब आले. त्यांच्याही शिरस्त्राणविहीन काळ्या पांढऱ्या केसांत कापसाच्या तंतूंचीं पुटेंच्या पुटें बसलेलीं मला आढळलीं. नाकपुडीच्या टोकाशींही एखादा तंतूच लोंबत असून खालवर करीत असावा अशी मला शंका आली. अं:, अखेर हें ऑफिस असलें तरी कांही खरें कोर्टांतलें ऑफिस नव्हे. गिरणीचेंच ऑफिस. रंकाच्या वैभवाला वैभव शब्द लावला म्हणून त्याच्या स्वरूपांत बदल थोडाच होणार आहे.

मॅनेजर साहेब जरा कामांत होते. त्यांनी आपल्या एका एंजिनिअरला हाक मारली. व लगेच एका तरुण तडफदार पण यंत्राजवळ असल्याने काळे काळे कपडे झाल्यामुळे मला न आवडणाऱ्या गृहस्थाबरोबर आम्ही गिरणी पाहूं लागलों !

"हां, पदर जरा सावरून घ्या, नाही तर एखादे वेळीं जरा जरी टोक अडकलें की जाल त्या पट्ट्याबरोबर ताडकन् छपरांत आणि एकदम आपटाल खाली !" किंचित् हसून एंजिनिअरने मला सूचना दिली. मी माझा पदर कमरेभोवती अगदी घट्ट ओढून धरला व ओचाही सावरला ! न जाणों !

"परवाच येथे एक असाच अपघात झाला. एक मजूर असाच सापडला, आणि जो एकदम वर फेकला गेला, तों त्याचें डोकें अगदी नारळासारखें ताडकन् फुटलें. बिचारा ! लागल्याचें दु:ख व्हावयाला कांही दोन सेकंद राहिला नाही." मी भयभीत होत्साती त्या जगड्व्याळ यंत्राकडे पाहूं लागलें. केवढालीं प्रचंड प्रचंड चाकें ! एक दोन तीन चार–अन् बारकीं तर किती तरी ! बापरे एखादा पट्टा तुटला तर ! दृष्टि ठरेल न ठरेल इतक्या भराभर गरगर एकसारखीं तीं प्रचंड चाकें आमच्या डोक्यावर सारखीं फिरत होती.

जमिनीवर एक मोठें यंत्र बसवलें असून त्यांत कांहीजण मोकळा

केलेला कापूस भरीत होते. एक पोतें ! दोन ओतलीं ! क्षणांत खलास ! काय राक्षसी स्वाहाकार ! "किती माणसें काम करतात येथे ? " मी अगदी चमत्कारून जाऊन विचारलें. "अं ! थोडीं आहेत. २५–३० म्हाताऱ्या बायका आणि किती १०–१२ गडी माणसें. फार तर फार असतील ५०." पन्नास माणसें ! पण त्या यंत्राच्या विराट स्वरूपापुढ तीं कोठल्या कोठे लोपून गेलीं होतीं. दृष्टीला कांही दिसेल तर गरगर फिरणारीं प्रचंड चक्रें ! लहान चक्रें ! त्यांत सरकणारे भरदार लांबच लांब पट्टे व सटासट् सटासट् आवाज करून कापसाचा स्वाहा करणारें यंत्र. मी अगदी दडपून जाऊन त्या देखाव्याकडे पाहत होतें.

एंजिनिअर साहेब मात्र त्यांनी नुकत्याच बसवलेल्या–धूळ शोषून घेण्याकरतां बसवलेल्या–नव्या यंत्राची योजना आम्हांला समजावून देण्यांत गुंग होते. त्यांनी आम्हांला समजावून सांगण्याकरतां कुठेसा खटका दाबला आणि एकदम सारीं चाकें थंडावून बंद झालीं. "अं ! हें काय!" किंचित् मी घाबरूनच विचारलें. "कांही नाही, मी खटका दाबला आहे, तुम्हांला दाखविण्याकरतां."

"पहा तो कापसांतील खकाणा, धूळ उडतेना ?" एंजिनिअर साहेब सांगूं लागले. मला त्यांचें सांगणें कितपत समजलें तें सांगतां येत नाही. एखाद्या अभिजात कलावंताप्रमाणें ते त्या यंत्रागाराचें रहस्य अगदी उकलून सांगण्यांत रंगले होते. मीही यंत्राच्या चमत्कृतिपूण सामर्थ्याला भूलून त्यांचें म्हणणें ऐकत होतें. हा खटका दाबला की अस्सें...सुरू-हा दाबला की बंद–केवढीं तीं जगड्व्याळ चाकें, त्यांची गति आणि कुठे ही बारकीशी कळ! माझ्या मनावर अखेर साऱ्या दोनच गोष्टी ठसल्या. यंत्राची बेफाम शक्ति आणि त्याच्या शेवटीं असणारा लहानसा खटका. अल्लादिनाच्या दिव्याप्रमाणें प्रचंड राक्षसांवर हुकमत चालविणाऱ्या त्या लहानशा खटक्याकडे मी आश्चर्याने व कुतूहलाने पाहूं लागलें.

"आम्ही शक्य तितकी नवी यंत्रसामुग्री बसवीत आहोंत." एंजिनिअर मिस् रोझना समजावून सांगत होते. माझें तिकडे लक्ष्यच

नव्हतें. या दुसऱ्या खोलींत आल्यापासून बंडगार्डनच्या लहानशा धरणाप्रमाणें वरच्या रुळावरून खाली उडी घेणाऱ्या कापसाच्या पांढऱ्या शुभ्र व विरल पण रुंदच्यारुंद पसरलेल्या प्रवाहाने माझें लक्ष खेचून घेतलें होतें. शेवटच्या रुळावरून खाली आला की लगेच त्या प्रवाहाला दोन फाटे फुटत. हळू हळू किंचित् पीळ पडून त्याचें स्वरूप गोल, भरदार व अरुंद अरुंद होत जाई, व अखेर तर यंत्राच्या दोन्ही बाजूंना लावलेल्या नळकांड्यांत अगदी पांढऱ्या शुभ्र शेवयांप्रमाणें त्याचे एकावर एक वळसे पडूं लागत. मला फार गंमत वाटली त्या यंत्राची! मी कापसाचें प्रथम पाहिलेलें स्वरूप व हें, यांत किती फरक पडला होता? तो हाच कापूस? छे! त्यांतला केरकचरा, काळेपणा! आणि यांत तर त्याचें नांवही नव्हतें! क्षणभर मला ही कापसाची वेगळीच जात असावी असेंही वाटल्याशिवाय राहिलें नाही. पण समोर दिसणाऱ्या देखाव्यापुढे कापसाची जातबीत सुचत होती कोणाला? वरच्या रुळावरून खाली सोडलेला स्फटिक मण्यांचा तो रुंदच्यारुंद पडदा, मध्येच त्याचे दोन भाग, शेवटीं पटवेकऱ्याप्रमाणें शेवट जरासे पिळन आलेलीं भेंडोळीं! 'समजा तार मध्येच तुटली तर'—मी एका मजुराला विचारलें. 'अं, त्याचें काय, फिरवून जुळवून द्यावयाची!' म्हणून जणू काय आपलें कौशल्य दाखविण्याकरतांच त्याने खटका फिरवला. भरलेलें नळकांडें उचललें. दुसरें लावून दाखवलें. फिरून खटका, फिरून गंमत चालू. फिरून तो पांढऱ्या शुभ्र विरल स्फटिकाचा शेला!

मिस् रोझ व एंजिनियर पुढे चालूं लागले. मलाही पुढे जावें लागलें. पण त्या खोलींत पाऊल टाकतांच मी नुसती विस्मित होऊन पाहत राहिलें!

एक, दोन, तीन, नव्हे शेंकडोशें पऱ्या आपले पांढरे शुभ्र आखूड झगे उडवून भराभर ओळीनें नाचताहेत! किती रांगा! मध्ये दोन माणसें उभीं केलीं असतां मावतील न मावतील इतकी जागा. त्यांतून

कांही बायकाही उभ्या असलेल्या. पण छं ! त्यांना काय पाहायचें ! खालच्या पोलादाच्या चकचकीत बैठकीवर एकाच पायावर उभें राहून नाचणाऱ्या त्या चकत्याच अधिक चित्ताकर्षक होत्या. बापरे काय गिरक्या ह्या ! त्यांच्या ह्या विलक्षण गिरकीने त्या हळूच निघणाऱ्या धाग्याला भराभर पीळ चढतो आहे, पण त्या कशाला घेतात लक्षांत. खरोखर एखाद्या परिस्तानांत आल्याप्रमाणें मी त्या नाचाने अगदी वेडावून गेलें. हा काय प्रकार आहे तें मला कळेना. तेथे असलेल्या बायका माझ्याकडे टवकारून पाहत होत्या, तिकडेही लक्ष जाईना. माझी नजर नुसती त्या फिरत्या चात्यांवर खिळून राहिली ! त्यांच्याकडेच नजर देत मी दोन्ही रांगांमधून चालूं लागलें. 'बाई, पदर अडकेल एखादा !' एक बाईने सूचना दिली. आणि मी भानावर आलें. खरोखर ह्या एवढ्याशा जागेंत हीं माणसें वावरतात तरी कशीं ? त्या सूचनेने माझ्या मनांत प्रश्न उद्‌भवला ? "किती चात्या एक एकजण पाहतां ?" मी एका माणसाला विचारलें ? "ही सबंध ओळ !" "सारखें या भिंगरीसारखेंच चालावें लागत असेल नाही तुम्हांला ?" "अं, त्याचें काय ? होते सवय !"

"तुमच्याकडे किती माणसें एका साच्यावर काम करतात?" मिस् रोझने विचारलें ! साचे तिकडे चालतात असें म्हणून एंजिनीअर साहेबांनी तिकडे मोर्चा वळवला. मी फिरून एकवार त्या नाचणाऱ्या चात्यांकडे डोळे भरून पाहून चालूं लागलें ! माझ्या जवळच्या साच्यांतून आवाज येऊं लागला. मी दचकून तिकडे पाहिलें; कारण माझें लक्षच तिकडे नव्हतें. दोऱ्यांच्या रंगीत उभारलेल्या पडद्याने माझें लक्ष वेधलें होतें. सट् सट् एक लहानसें कांही तरी उडून दुसरीकडे पडलें, सट्, फिरून परत आलें. 'कायरे हें !' मी खूप जोराने ओरडून त्या मजुराला विचारलें. त्या कानठळ्या बसून जाणाऱ्या आवाजांत माझा आवाज त्याला प्रथम ऐकूं येईना. "कांही नाही, धावता धोटा आहे हां ! हा असा इकडून तिकडे जातो आणि कापड विणलें जातें. या

पाण्या आहेत ना, यांतून उभी बाजू ही अशी तयार करून घेतली की झालें." साचा थांबवून त्याने मला समजावून सांगितलें.

"दोन साचे चालवतात हे!" मी जरा आश्चर्याने एंजिनिअरकडे पाहून विचारलें.

"दोन? जपानांत एक पोरगी आठ आठ साचे चालवते. आपल्याकडे आता कोठें माणशीं तीन साचे आम्ही कांही ठिकाणीं सुरू केले आहेत. वास्तविक काय असतें ह्यांना काम? एकदा नीट लावून खटका सुरू केला की खलास! चार काय नी आठ काय?" आणि खरेंच तो माणूस फारसें कांही करीत नव्हता. धावता धोटा इकडून तिकडे सटासट् उडया मारी, प्रत्येक क्षणाला एकेक आठी पडून हळूहळू कापड पुढे सरके. त्या जवळ जवळ दिसणाऱ्या सुताच्या जाळींतून हळूहळू छानदार, घट्ट विणलेलें पातळ बाहेर येत होतें. दोन वीत दिसणारे ते तांबडे पिवळे दोरे, बारीकशा दोन किनारींत संकलित झाले होते. माझ्या डोळ्यांवर विश्वास न बसल्यासारखें होऊन मी मात्र त्या पातळाला हळच हात लावून पाहिला!

"किती वेळ लागतो कापसापासून अगदी पुरा कपडा व्हावयाला?" यंत्रयुगाच्या करामतीने स्तिमित होऊनच मी त्याला विचारलें. "अं, फार तर चारपांच तास लागत असतील!" एंजिनिअरने स्वाभिमानाने उत्तर दिलें. मीही यंत्राच्या अद्भुत सामर्थ्याने चकित होऊन त्या साच्याकडे पाहत राहिलें.

दुसऱ्या एका ठिकाणीं रंगीत डिझाईनच्या चादरी तयार होत होत्या. वास्तविक पुढे उभा असलेला उभ्या दोरांचा तणावा मागे पाहिल्यासारखाच दिसत होता, पण चादरीवर मात्र सुंदर कमळांची वीण आलेली होती.

काय मनुष्याचें डोकें आहे! आणि त्याची करामत तरी किती?

तेथे सारें यंत्राने चालले होतें. घडपा यंत्राने, छाप यंत्राने, ताणणें यंत्राने, उचलणें यंत्राने! खरोखर माणसाचें बुद्धिसामर्थ्य विल-

क्षण आहे. एवढासा असहाय प्राणी पण राक्षसासारख्या पंचमहाभूतांना सुद्धा केवळ आपल्या बुद्धीच्या जोरावर नमवून सारें विश्व पादाक्रांत करतो ! चार तासांत कापसापासून तलम कपडा ! विश्वामित्राच्या जगनिर्मितीची दंतकथा नाही. खरोखरच या युगांत मनुष्याने परमेश्वराशीं स्पर्धा चालवलेली आहे. कुठे ती महिनेच्या महिने रात्रंदिवस खपून अखेर दिसावयाला जाडीभरडीं दिसणारीं वस्त्रें, व कोठे चार तासांच्या आंत गरिबांच्याही हातांत मिळणारें हें तलम कापड !

"तुमच्यांकडे या फण्या कशा ओवून येतात ?" मिस् रोझने प्रश्न केला. माझें कुतूहल अधिक वाढले; न जाणों येथे ओवण्याचेंही एकादें यंत्र असावयाचें. आमच्या स्वाऱ्या एंजिनिअरच्या मागोमाग ओवण्याच्या खोलीकडे चालूं लागल्या. या खोलींत एक एक अशी चौकट लोंबकळत असून तिच्या दोन्ही बाजूला दोन दोन मनुष्यें दोरे ओवीत बसलेलीं होतीं. भराभर अचूकपणें दोरा ओंवण्याचें त्यांचें तें काम पाहून मला कौतुक वाटलें. पुरुष असून इतक्या सफाईने अं !

खास मला नाही इतक्या लवकर सुई ओवतां येणार !

"डोळे दुखून येत असतील नाही ?" मी जरा त्यांची कल्पना यऊन सहानुभूतिपूर्ण स्वरांत बोलूं लागलें;—

"किती वेळ काम करतां तुम्ही हें ?"

"दहा तास." त्या माणसांनी उत्तर दिलें.

"काय दहा तास ! सारखे दहा तास दोरे ओवायचे ? अगदी कंटाळवाणें होत असेल नाही ?"

"हां बाई, पण पोटाकरतां करायला पाहिजे ना !"

मला उत्तर मिळालें आणि कां कोण जाणें मला बरें वाटलें नाही.

मिस् रोझ् व इंजिनिअर बोलत बोलत पुढच्या खोलींत शिरलीं. मीही त्यांच्या मागोमाग आंत शिरलें. "बाई इकडे कोणीकडे ?" एकदम मला कोणी तरी प्रश्न विचारला. मी दचकून मागे वळून

पाहिलें. मला ओळखणारें कोण येथे हें, म्हणून पाहतें, तों सहा नंबरच्या चाळींतील काशाबाची स्वारी त्या ठिकाणीं काम करीत असलेली मला दिसली. त्याच्यापुढे एक लांबच लांब दोऱ्यादोऱ्यांचा तणावा पसरलेली चौकट असून ती सारखी खालवर करीत पुढे येई, मागे जाई. मला मोठी गंमत वाटली. एंजिनिअरने काशाबाला थांबवलें, व पुढे पाठीमागे होण्यांत ते तणावे खालवर कसे होत जातात, तें आम्हांला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला.

"काशाबा काय रे हें ? काय म्हणतां तुम्ही याला ?" मी काशाबाशीं बोलूं लागलें.

"हात्त्येच्या त्येला मोट बोलतात बाई ! ही अशी पुढे जाते आणि खटका बसतो. लगेच खालचा दोर वर येतो आणि येरून अशी म्हाघारी जाते."

"कायरे, केवढी भारी रुंद आहे नाही ? एकटाच का काम करतोस हिच्यावर ?"

"न्हाई बाई; एक दुसरा पोरगा हाय ना मदतीला !" बोलतां बोलतां काशाबा सारखा मोटेवर मागेपुढे जात होता. पसरलेल्या तणाव्यांतील मधला दोरा तुटला की त्याची सरावलेली नजर अचूक ती जागा हुडकून काढी आणि दोरा सांधून देई ! फिरून मोट सुरू.

"कायरे, सबंध वेळ हें असेंच का करावयाचें ?"

"नाही तर काय बाई, मोटच ती ! मोटच्या बैलावाणी आम्ही सारख माग जातुया पुढ येतुया. पर त्येयबी कोणी धा तास न्हाई लावीत मोटेला. येथ अक्षी धा तास ! जरा चिलीम वढेन म्हटलें तर फुरसत बी न्हाई." मागे पुढे जातां जातां दोरे सांधीत काशाबा अर्धवट हासत बोलत होता.

"पण गंमत वाटते नाही यंत्राजवळ काम करायची ? एक कळ दाबली की झालें सुरू, राक्षसासारखें काम !" "हां बाई ! पण त्ये गंमत कोणास्नी ? तुम्हांस्नी गंमत ! पर असं बैलावाणी धा तास

मागे पुढे म्हण्यांत कसली आलिया गंमत !" काशाबाचा नेहमीचा सूर सुरू झाला.

सकाळच्या प्रहरीं गुलाबी झोपेंत गोड सुखस्वप्नें पाहत अर्धवट गुंगींत असतां एकदम दूधवाल्या भय्याची रुक्ष हाक ऐकून जागें व्हावें तसेंच काशाबाने केलें. मी शोधक नव्हतें, पण यंत्रशक्तीच्या करामतीने दिपून जाऊन मला मानवी सामर्थ्याचा कैफ चढू पाहत होता. निसर्ग आणि मनुष्याचें एवढेंसें डोकें यांच्या अष्टौप्रहर चाललेल्या प्राणान्त चुरशीच्या सामन्यांत दर वेळीं मनुष्य पुढेच पाऊल टाकीत आहे. ज्याला एवढीं प्रचंड धुडें नुसतीं खटक्यासरशीं चालतीं करतां येतात, पंचमहाभूतांना पायाच्या नुसत्या आंगठ्याखाली दाबून सहज लीलेने खेळवतां येतें, तो मनुष्य काय करूं शकणार नाही ? असा विचार करून यांत्रिक युगाचीं गोड गोड स्वप्नें पाहत यंत्रांमुळे सुखकर झालेलें आयुष्य मी रेखाटूं पाहत होतें. पण त्या सुखस्वप्नांतून काशाबाने मला जागें केलें.

काशाबा म्हणतो, "बाई, खटका फिरला की मोट चालू होते खरी, पण आम्हांला बी बैलावाणी माग म्होरं करावं लागतं !" मनुष्याने निर्माण केलेल्या यंत्रापाशीं त्याचें हेंच का स्थान ! अंहं, कांही तरी चुकतें आहे.

गोड स्वप्नांतून जागें केल्याबद्दल रागावून फिरून डोळे मिटून तेंच स्वप्न पाहण्याचा प्रयत्न करावा तसें मीं केलें. माझ्या मनांतून काशाबाला धुडकावून लावलें व फिरून अल्लादिनाच्या त्या गुहेंत मी चोहोकडे पाहूं लागलें. पण ती जादू आता उडून गेली होती. "छे, सारे ६ हजार मजूर तर आहेत या गिरणींत ! तशी फारशी मोठी नाही." एंजिनिअर साहेब मिस् रोझना सांगत होते.

सहा हजार ! फिरून माझें मन विचार करूं लागलें. या सहा हजार माणसांचें येथे स्थान काय ? त्या प्रचंड जगड्व्याळ धुडांशीं हीं सारींच कां अशीं जखडून पडलीं आहेत ? सारेच काशाबा-

सारखे १० तास नाही का तेंच काम करीत ? दहा तास तेच दोरे ओवणें, तेंच बाबीन भरणें, तेंच साच्याकडे लक्ष देणें, तसेंच मोटेबरोबर मागे पुढ होणें—काय आयुष्य हें ! मला असें १० तास तेंच तें काम करायला कोणी सांगितलें तर ?

यंत्र, पट्टा नाही २४ तास सारखें चालत ? पण मनुष्य कांही यंत्र नव्हे. त्याला मन आहे. त्याच त्याच गोष्टी करायचा त्याला कंटाळा येतो. प्रो. गोडबोल्यांनी एकदा अमेरिकेंतील अनुभव सांगतांना दिलेल्या उदाहरणाची मला आठवण झाली. " तूं दहा वर्षें या मोटारच्या कारखान्यांत काम करतोस; तुला सगळ्या कामाची चांगली माहिती झाली असेल नाही ?" त्यांनी एका मजुराला विचारलें.

"नाही. आमच्याकडे 'स्पेशलायझेशन' आहे." त्याने उत्तर दिलें.

"मग तूं काय करतोस ?"

"आज दहा वर्षें सतत मी १०२४ हा नंबर खिळ्यांनी बसवतों आहें." यांत्रिक युगाचा स्पेशलायझेशन हा विशेष आहे. दहा वर्षें १०२४ हा नंबर बसवणें, दहा वर्षें दहा तास सारखे दोरे ओवणें, दहा वर्षें दररोज दहा तास साचे पाहणें, हेंच अखेर यंत्रानें माणसाला दिलें काय ?

गिरण्यांनी गोरगरिबांना सुद्धा तलम कापड मिळतें खरें, स्वस्तही मिळतें. पण पैशाच्या स्वस्ताईबरोबर त्यांना मनुष्यजीविताची दुसरी काय जब्बर किंमत द्यावी लागते आहे ! सकाळीं सातला हे मजूर येथे येतात, संध्याकाळीं सहाला जातात. तोंपर्यंत तेंच तें कंटाळवाणें एकच एक काम ! काय एक तास जेवायला लग लग करीत जातील तेवढे.

या दहा तासांनंतर त्यांच्यांत काय त्राण उरत असेल ? ऊस चरकांत घालून पिळून काढावा तशीच यांची स्थिति आहे. गिरणींतील कामांत असे दहा तास घालविल्यावर उरलें जीवन म्हणजे उसाचा पाचोळा !

मुंबई, १९३१

# काशाबाचें स्वप्न

मुंबईंत राहण्यापूर्वी मी येथे आलें म्हणजे मला मुंबईच्या बालू लोकांची मोठी गंमत वाटे. चाळींत काम करावयाचें, घरोघर काम करतां करतां मिळेल तें खावयाचें, दुपारीं तण्णावून उन्हांत झोप. फिरून संध्याकाळीं काम. मग रात्रीं एकदा धुणेंभांडीं आटोपलीं की म्युनिसिपालटीच्या दिव्याखाली बसून पत्ते झोडायचे, झोप आली की रात्रीं असें कोठे तरी आडसांधींत, जिन्यांत, गच्चींत, नाही तर शेवटीं रस्त्याच्या पदपथावर कोठे तरी पसरलें की झालें काम. सकाळ झाली की फिरून झालें काम सुरू.

ना घर, ना दार, ना बायको पोर की आप्तेष्ट. एवढेंच नव्हे, स्वयंपाकाची सुद्धा खटखट नाही. अशा या मुंबईविशिष्ट प्राण्याचा जीवनक्रम मोठा विचित्र असतो. बाहेरगावीं हें चित्र तुम्हांला कधीच आढळत नाही. तेथे तुमच्याकडे काम करीत असलेला माणूस सकाळीं चारपासून तुमच्याकडे कामाला येईल, पण रात्र झाली की आपल्या अशा तोडक्या मोडक्या कां होईना खोपटांत जाऊन पडेल. पण येथे असें नाही. त्यामुळे साडेतीन हाताच्या आराखड्याबरहुकूम कापलेली आगापिच्छा नसलेली बालूची मूर्ति चाळींतून, नळावर, जिन्यांत,

चोहोकडे वावरतांना पाहिली की मोठी गंमत वाटते. आणि 'अरे, हा पहा शहराच्या कारखान्यांत तयार होत असलेला अस्सल शहरविशिष्ट माल,' म्हणून त्याकडे बोट दाखवावें असें वाटतें.

मुंबईंत राहून मजूरवस्तींत काम करायला लागल्यावर तेथे सुद्धा असाच एक पण दुसऱ्या प्रकारचा शहरी नमुना माझ्या पाहण्यांत आला आहे. मात्र त्याची तऱ्हा अगदी निराळी आहे. यांतील लोक कितीही वर्षें मुंबईंत राहिले तरी त्यांना मुंबई कधी आपलीशी वाटूं शकतच नाही.

वास्तविक मुंबई शहर म्हणजे खरोखर हिंदुस्थानाच्या साऱ्या कोपऱ्यांतून येणाऱ्या अठरापगड लोकांना एकत्र मिसळण्याचा–शहरी बनविण्याचा–कारखाना. पण वालांत न शिजणाऱ्या चहाडाप्रमाणें त्यांतून सुद्धा हे लोक अलग राहतात, सर्वांत मिसळून जाऊं शकत नाहीत. संसार मुंबईला, पण घरदार मुलखाला, अशी यांची द्विधा मन:स्थिति असल्यामुळे सदैवच 'भाऊच्या धक्क्यावर' बोचकं बांधून तयार असल्यासारखे ते बोलत असतात. मुलाला शाळेंत घालण्यापासून तों महिनाभर विषमाने आजारी पडलेल्या मुलीला, नाही तर बायकोला, डॉक्टरला दाखविण्यापर्यंत कोणतीही गोष्ट त्यांच्यापाशीं काढा, त्यांत मुलूख आला नाही किंवा मुलखाला गेल्यावर सर्व कांही ठीक होईल असें तुम्हांला उत्तर मिळालें नाही, असें होऊंच शकत नाही.

असें कां होतें याचें मला नेहमी कोडें पडे. इतकीं वर्षें मुंबईंत राहूनही हे लोक बदलूं कां इच्छीत नाहीत, यांना मुंबई आपली अशी कां वाटत नाही ! काम करीत असतांही नकळतपणें माझें मन याचें उत्तर शोधूं पाहत असे.

एखाद्याला मोठ्या कष्टाने लावून दिलेलें काम सोडून तो एकदम 'मुलखांत' गेलेला ऐकला की, अरे हे लोक असे वेडे कसे, हे का काम सोडून जाण्याचे दिवस का आहेत ! बरें. बदली वगैरे कोणी द्यायचा, तें सुद्धा नाही. असें कसें हें ? यांना काय पैशाची गरज नाही ? इकडे तर पै पै करतां मारे प्राण टाकीत असतात आणि इकडे पाहावें

तर अशी बेफिकिरी. कां हें असें ? यांना जरा कोणी शहाणपणाने वागायला कसें शिकवीत नाही ?

पण माणसाचें सारें आयुष्य शहाणपणाचें–किंवा शुद्ध तर्कबुद्धीचें –बोट धरूनच चालत असतें काय ? खास नाही. आणि मला वाटतें, तसें तें नाही म्हणूनच त्यांत इतकी मजा आलेली आहे. शुद्ध तर्काच्या पांढऱ्या रंगापेक्षा त्यांत उठणाऱ्या भावनांच्या रंगीत छटांनीच आयुष्य अधिक खुलून दिसतें. मात्र आतापावेतों येथे कोणती छटा वावरते याचा शोध लागला नव्हता. त्यामुळे शिवीत असतां दर टाक्याला नडत असलेल्या धाग्यांतील बारीकशा गाठीप्रमाणें दर वेळीं कोठे तरी खटकतें, अडतें, असाच मला अनुभव येई. पण ती गाठ न सोडवतां आल्याकारणाने मी केवळ त्रासून मात्र जात असें. पण आज मात्र तसें वाटत नाही. आपल्याला न सुटणारें एखादें गणित मनांत घोळत असावें आणि मध्येच एकदम कांही तरी करीत असतां त्याचें उत्तर सुचावें तसें माझें झालें.

वास्तविक काशाबाला रामाला शाळेंत घाल, रामाला शाळेंत घाल, म्हणून मी किती वेळां सांगितलें असेल. त्याच्यासारखा चलाख मुलगा शिकलासवरला तर तुझ्याच पुढे उपयोगी पडेल, इ० लालचीच्या गोष्टी सुद्धा समजून सांगितल्या असतील. पण त्याचें आपलें एक उत्तर. "आम्ही येथे थोडींच राहायचीं आहोंत ! आज ना उद्या मुलखाला जाणार ! तेथे कोठे हाये ती शाळा न फिळा; मग कशेला उगीच पाटी बुकाचा खर्च ?" आजही प्रथम माझ्या त्याच गोष्टी चालल्या होत्या. पण हळूहळू मात्र त्या रामावरून मुलखावर केव्हा गेल्या हें आम्हांला कळलेंच नाही. एवढें खरें की त्या सांगतांना काशाबा जो रंगून गेला तो इतका की एरव्ही हाच तो रामाचा बाप काशाबा असें मला कोणी सांगितलें असतें तर मी खरें सुद्धा मानलें नसतें. त्याचा तो अकालीं सुरकतलेला म्हाताऱ्यासारखा दिसणारा चेहरा पार पालटला. सदैव दबल्या व संशयी वृत्तीने जगाकडे पाहणारे त्याचे डोळे चमकूं लागले.

काजूच्या डोंगरावर लहानपणीं आपण मोकाटपणें कसें भटकत असूं, एकदा सारेजण जमलों की एकदम कर्कश शिळा घालून आसपासचा तो प्रदेश कसा दणाणून सोडीत असूं, याचें वर्णन करतां करतां त्याच्या चेहेऱ्यावर स्वैरपणें रानांत बागडणाऱ्या खेळकर मुलाचें पाणी चमकूं लागलें. एका झोपेवर उठून खोताच्या वाडींतले आंबे चोरून आणतांना तेथल्या विहिरीजवळच्या बकुळीवर राहात असलेल्या हेडलीचें त्याचें वर्णन ऐकत असतां तर ती दर्याच्या घनगंभीर आवाजानें निनादित असलेली, नारळी पोफळीच्या झापांनी सळसळत असलेली, झाडांच्या दाट सावल्यांनी मनाला लहानपणीं भेवडावून सोडणारी कोकणची रात्र खरोखरीच माझ्या डोळ्यासमोर उभी राहिली. आपल्या बाळपणींच्या गोष्टी सांगत असतां तो आज खरोखर इतका उमलला होता की तेथे चालत असतां प्रतिक्षणीं दूर सरकणाऱ्या क्षितिजरेषेप्रमाणें हळू हळू भोवतालच्या परिस्थितीचे बांध त्याच्या मनांतून दूर होऊं लागले. क्षणभर तो भोवतालचें सारें विसरला व जणूं काय पूर्वकालच्या त्या गंमतींचें प्रत्यक्ष सुख अनुभवीत असल्याप्रमाणें त्याचे डोळे चमकूं लागले.

मी त्याच्याकडे किती तरी वेळ टक लावून पाहत होते! चाळींतली घाण, बजबजपुरी, गिरणीचा खडखडाट अशासारख्या घाणेरड्या पार्श्वभूमींतून काशाबाचें चित्र उचलून आज कोणी तरी कोकणच्या वनश्रीने गजबजलेल्या शांत व रम्य वातावरणांत नेऊन ठेवलें होतें. आणि त्यामुळे आतापर्यंत कधी न दिसलेला आनंदकल्लोळ मोकळेपणा त्याच्या चेहऱ्यावर प्रतिबिंबित झालेला मी पाहत होतें.

काशाबाचा तो चेहरा पाहिल्यापासून मला माझें कोडें सुटलें असे सारखें वाटत आहे. ज्या पार्श्वभूमींत हें चित्र इतकें जिवंत व खुलून दिसतें ती बदलली जात असल्यामुळे तर जिवंतपणा नष्ट होत नसेलना?

कांही झाडें दुसऱ्या जमिनींत वाढूं शकतात, मरून जात नाहीत, पण त्यांच्या मायभूमींत जी टवटवी, जें तेज त्यांच्या ठिकाणीं दिसतें तें

मात्र तेथे येण्यास पिढ्यांचाच कालावधि लोटावा लागतो. त्याचप्रमाणें मुलखांत शेतावर असतांना शांतपणें, सावकाश, निर्वेधपणें काम क ीत वाढलेले हे जीव मुंबईच्या कोंदट गजबजलेल्या वातावरणांत गेले की उबून जात असावेत. मुंबई चांगली असेल; त्यांत डांबरी रस्ते, सिनेमा, उंच उंच चाळी, गिरण्या, ट्राम, मोटारी, यांची मोठी गंमत असेल. पण कांही असलें तरी हें ठिकाण आपलें नव्हे, असेंच सारखें आंतल्याआंत त्यांना वाटत असावें. आणि मग काय होतें हें सांगतां न आल्यामुळे ज्याप्रमाणे आईवेगळें झालेलें लहान मूल फक्त 'आईकडे' 'आईकडे' एवढे शब्द उच्चारूनच आंतली खळबळ सांगूं शकतें त्याप्रमाणें यांचें मनही मुलखाकडे मुलखाकडे असा धावा करीत राहतें. मला काशाबाचे शेवटचे शब्द आठवताहेत. "बाई माझी जमीन घरदार सारें सावकाराच्या घशांत गेलें नसतें तर येथे कशापायीं येत होतों. आपलं असं हाय काय या ममईंत? पैका मिळतो म्हणून येथे यावयाचें."* शेताचें काम जसें त्यांना आपलें असें वाटतें तसें गिरणींत होत नाही. तें केवळ मोलाचें काम करावयाचें म्हणून करावयाचें. मला वाटतें स्वत्वाच्या कल्पनेचा अभाव हेंच त्यांच्या मुलखाच्या ओढीचें कारण असावें. त्याखेरीज वेळीं अवेळीं काम सोडूनही जाण्याइतकें त्यांचें मन मुलखाकडे का धाव घेतें?

बास्तविक माझ्या माहितीप्रमाणें हा काशाबा आज उणींपुरीं

---

* आणि खरोखर खेड्यांतून मुंबईंत काम पाहावयाला येणाऱ्या प्रत्येक शेतकऱ्याचें हेंच कारण नसतें काय? पावसाचा रुसवा फुगवा, आधीच कार्याकरितां किंवा कारणाकरितां काढलेलें कर्ज, त्यांत एखाद्या आवर्षणाच्या दुर्दैवाची भर व त्यामुळे सावकाराची कराबी लागलेली घरभरणी, ही या लोकांची करुण कहाणी कोणाच्या परिचयाची नाही? सावकाराचें कर्ज फेडायला 'पैका' हवा आणि तो मुंबईत मिळतो म्हणून ते येथे येतात.

दहा वर्षें या मुंबईंत आहे. आणि कदाचित् यापुढचीं आणखी किती वर्षें त्याला येथे काढावीं लागतील हें खरोखर एक त्या काळालाच माहीत. पण हा दहा वर्षांचा कालावधि त्याच्या खिजगणींत तरी आहे का? कालच गावाहून मुंबई बंदरावर उतरावा इतक्या ओल्या जिव्हाळ्याने तो मुलखाच्या गोष्टी सांगत आहे. पहिलीं चार पांच वर्षें कदाचित त्याने आपण पैसा जमवून लवकर परत जाऊं या आशेने सगेवाल्याकडे, गाववाल्याकडे अशीं काढलीं असतील. पण आज त्याचीं बायकापोरें, आई, जवळजवळ मुलखांतील सारा संसार येथे आल्यासारखा झाला आहे. मात्र अजूनही काशाबाचें मन कोणतें स्वप्न पाहत आहे? गिरणींत नोकरी करून मुंबईस्थाईक होण्याच्या त्याच्या गोष्टी कधी कोणी ऐकल्या आहेत काय! छत्, त्याच्यापाशीं हें बोललें तरी त्याला आवडायचें नाही. परवाच रामाला तो म्हणाला, "राम्या लेका शहराचे एकेक ढंग शिकतोस! पण काय तुला येथं राहृयाचं हाय काय? आपली मुलखाची शेती." 'मरावें तर एक काशींत नाही तर आपल्या वेशींत' ही म्हण त्याच्या तोंडून मी कितीतरी वेळां ऐकली आहे! दुर्दैवानें तरुणपणीं नाही तर नाही साधलें, पण आपल्या जीवनाची संध्याकाळ तरी आपल्या मुलखांत, स्वतःच्या जमिनींत सत्तेच्या घरींदारीं घालवावी, अशी वेडी आशा बाळगून बिचारा आपलें मुंबईचें मुशाफिरी वाटणारें जीवन काढतो आहे. पण हें त्याचें गोड स्वप्न—वेडी आशा—कधी खरी ठरेल काय? काशाबासारखे मुलखाच्या धक्क्यावर आणखी किती तरी जीव हीच वेडी आशा धरून मुंबईंत उपऱ्यासारखे राहत असतील.

कोंकणच्या हृया पहिल्या पिढीकडे पाहिलें की त्यांचें शरीर येथे आलें पण मन अजून तेथेच रेंगाळतें आहे याची मला खात्री पटते. त्यांची ती घेरा ठेवलेली लांबच लांब शेंडी, कमरेला दुहेरी करून कसलेलें धोतर, कानांत हलक्या सोन्याची पोवळ्याची भिकबाळी इत्यादि साऱ्या गोष्टी त्याचीच मला साक्ष देतात. पण तरुण पिढी? तिला

मुलखाची आठवण होत असली, त्याविषयीं आपलेपणा वाटत असला, तरी त्यांच्या नजरेंत मात्र मुलखाचें पाणी खेळत नाही.

परवाच काशाबाचा मुलगा रामा, आपल्याला ड्रायव्हर व्हावें असें वाटतें, म्हणून मला सांगत होता. रामाला ड्रायव्हर होण्याची हौस असेल, दुसऱ्या कोणाला हपिसांतील लाल पट्टेवाला, निदान तें नाही तर साधा शिपाई तरी व्हावेंसें वाटत असेल.

मी काशाबासारख्यांच्या घरांत शिरून या तरुण पिढीला वळवण्याचा गनिमी कावा करूं पाहत आहें. पण तोंवर काशाबा व त्याच्यासारखेच कित्येक जीव मुलखाच्या वाटेकडे डोळे लावून आपलें घर, जमीन यांचें स्वप्न पाहत आहेत त्यांची वाट काय !

मुंबई १९३१

दृश्य नववें

# श्रद्धानंद महिलाश्रमास भेट

जुन्या लोकांत अशी एक समजूत आहे की, हिमालयावर विवक्षित ठिकाणीं मेलें असतां यमलोकांत यातना भोगीत असलेल्या जीवांचा आक्रोश ऐकूं येतो व त्यामुळे ऐकणाऱ्याच्या मनास उपरति होते. मात्र त्या किंकाळ्या किंवा आक्रोश साऱ्यांनाच ऐकूं येईल असें बिलकुल नाही. कांही थोड्याच व्यक्ति अशा असतात की त्यांच्या कानीं हे प्रकार पडावे व त्यायोगें अंतःकरण पिळवटन निघून त्यांनी स्वतःचा मार्ग जास्त सुलभ करण्यास झटावें.

ही समजूत खरी असो वा नसो, पण यांत मनुष्यसमाजाचें एक सत्य मात्र फारच खुबीदार रीतीने व्यक्त केलें आहे यांत संशय नाही. हिमालयाच्या उंच शिखरावर भटकत राहून गत व अदृश्य जीवांच्या यातना ऐकणें बाजस सारलें, तरी सुद्धा आपल्या समाजांत अशा किती व्यक्ति सापडतील की त्यांना आपल्या डोळ्यासमोर प्रत्यहीं घडत असलेल्या अन्यायांनी, संकटांनी, दुखांनी गांजलेल्या लोकांचा हृदयभेदी आर्त स्वर ऐकूं येत असेल ?

निरनिराळ्या राक्षसी रूढींनी, जुलमी कायद्यांनी, हजारों वर्षें बद्धमूल होऊन बसलेल्या समजुतींनी गांजलेले असहाय जीव फसून वा हताश होत्साते आडमार्गाला लागत आहेत. आयुष्याची कष्टमय यात्रा रखरखीत वाळवंटांतून चालत असतां आपुलकीच्या प्रेमळ शब्दांची तहान लागलेले किती जीव खरें पाणी म्हणून मृगजळाच्या पाठीमागे लागून अंतीं फशी पडत आहेत. यौवनाची कळी पुरती उमलली सुद्धा नसतां, मनुष्याची स्वार्थी पाशवी वृत्ति त्यांच्या अजाणतेपणाचा फायदा घेऊन कोवळ्या कळ्या पायाखाली तुडवून टाकीत आहे. या असहाय गांजलेल्या तुडवलेल्या जीवांचे करुण विलाप मोठ्याने ऐकूं येणें शक्य नाही. आले तरी, सर्वत्र दाट धुकें पसरलें असतां समोरची वस्तु दिसूं नये त्याप्रमाणें डोळ्यांदेखत प्रत्यहीं या गोष्टी घडत असतां त्यांच्याकडे कळत वा नकळत डोळेझाक होत आहे. एकीकडून दुसरीकडे या गोष्टी हळूच कुजबुजल्या जात असतां त्यांचें आधीच विकृत स्वरूप सामान्य जनदृष्टीला अधिकच विकृत दिसूं लागतें. व पडलेल्या व्यक्तीला उठायला हात न देतां समाज व सामाजिक कल्पना तिला उलट खोलांत मात्र लाथाडून देतात. या पतित व्यक्तींच्या अंतःकरणाचे मुके कढ समाजाला कुठून ऐकूं येणार ?

आज सहा कोटि समाज हिंदु म्हणवला जात असतां हिंदुधर्माला —देवदर्शनाला सुद्धा—पारखा होऊन बसलेला आहे. उघड्या पडलेल्या खाद्य पदार्थांवर कावळ्यांनी चोहोंकडून येऊन झडप मारावी, तद्वत् ख्रिस्ती व मुसलमानी धर्म हजारोंनी आमचे लोक लांबवीत असतां आमच्यांतील धर्ममार्तंड उघड्या डोळ्यांनी निर्विकार नजरेने हें सारें पाहून अजून थंडच बसले आहेत. हजारों लाखों लोक निढळाच्या घामाने सुद्धा अन्न मिळत नाही म्हणून तडफडत असतां त्याच शहरांत हजारों लाखों रुपये शर्यतीच्या मैदानावर केवळ चैनीसाठी खर्च होत आहेत. परदेशांत आमच्या लोकांकडून ओतला जाणारा पैसा लक्षांत घेतला तर अजूनही हिंदुस्थानांत सोन्याचा धूर निघत आहे असेंच त्या

लोकांना वाटत असेल ! हिंदुधर्माच्या परिसरांत बसलेल्या या सहा कोटि अस्पृश्यांच्या किंवा दाराबाहेर तळमळत असलेल्या भुकेकंगाल लोकांच्या गोष्टी सोडल्या, तरी शेजारीं, तुमच्या घरांत, कितीक वेळां प्रत्यक्ष तुमच्याकडून, कळत नकळत तुमच्या आयाबहिणींवर काय जुलूम होत आहे, काय अन्याय घडत आहेत, याचा आपण कधी विचार केला आहे काय ? एक वेळ युद्धांत प्राणघातक शस्त्रास्त्रांनी येणारा उघड मृत्यु पुरवला, पण अदृश्य शृंखलांच्या जाचणीने होणारें मृतवत् जीवन नको.

या ओसरीवरच्या सामाजिक अन्यायांची ओळख-चीड आणण्या-इतकी-'**श्रद्धानंद अनाथ महिलाश्रमा**'कडे नुसती ओझरती नजर टाकली तरी होण्यासारखी आहे.

   

ही पहा ! मृगजळाच्या मागे धावत जाऊन फशीं पडलेली हरिणी. नवऱ्याचें छत्र नाहीसें झालेलें. हक्काचें प्रेमाचें असें एकही माणूस राहिलेलें नाही. सासरीं, माहेरीं लहानापासून मोठ्यापर्यंत सर्वांच्या खस्ता खाव्या, पण त्याचा मोबदला म्हणून एक गोड शब्द सुद्धा कोणी बोलूं नये, की खाल्लें प्यायलें सुद्धा विचारूं नये ! कल्पना करा, असें निष्प्रेम सहानुभूतिशून्य जिणें कंठणें किती जड आहे तें ! मनुष्याला मन आहे. शरीराला खाण्यापिण्याची आवश्यकता लागेल त्याप्रमाणें मनालाही सहानुभूतीची, प्रेमळ शब्दाची इच्छा असते; पण तिला वाव कोठून ? तिच्याविषयीं आपलेपणा वाटायला ती पाहिजे आहे कोणाला ? "तिचें नशीब फुटलें !" खरोखरच फुटलें. पुरुष जात तिच्याकडे निराळ्या दृष्टीने पाहूं लागली. तिच्याच भगिनी दयार्द्र कोमल अंतःकरणाच्या म्हणून प्रसिद्ध ! पण—? कावळ्याच्या पिलाला इतरांनी स्पर्श केला म्हणजे कावळे सजातीय असतांना सुद्धा टोचून मारतात, तद्वतच तिची अवस्था ! सजातीयांना तिच्याविषयीं सहानुभूति वाटणें दूरच राहो, लाखो घरांतून तिचें जीवन स्त्रीवर्गाकडूनच

जास्त खडतर केलें जातें. तापलेल्या रसरशीत शब्दांनी आधीच पोळलेल्या मनावर डागण्या देण्यांत येतात. अशा स्थितींत मन शून्य होऊन ही असहाय अबला आपण कोणाचा आश्रय घेतों याचें भान न राहतां, आम्रवृक्ष समजून नागफणीच्या सावलीला बसली..........



ही पहा भांडून रागाच्या भरांत वैतागून घराबाहेर पडलेली स्त्री. रागाच्या झपाट्यांत कसलेंही भान राहिलें नाही. "या घरापासून कोठे तरी दूर दूर जाऊं दे" ही एकच जाणीव! ही बाहेर पडली खरी. पण जाणार कुठे? पैसे नाहीत, कसली माहिती नाही. या अज्ञानाचा व रागाच्या आंधळेपणाचा फायदा घ्यायला काय कमी नराधम टपून बसले आहेत? धर्माच्या नांवाखाली परस्त्रीला भ्रष्ट करण्यांत भूषण मानणारे भोंदू कांही कमी नाहीत. धर्माकरितां, मदतीच्या मिषाने असहाय स्त्रीला घेरणारे कांही कमी नाहीत. एका बेभान क्षणीं हिने अविचाराने मदत तर घेतलीच. मदतीचा मोबदला म्हणन हा नराधम आपल्या प्राणापलीकडे असलेल्या अब्रूवर घाला घालील असें तिच्या मनांत सुद्धा आलें नसेल. पण मग उपयोग काय! मांजराच्या तडाक्यांत सापडलेला उंदीर कितीसा सुटूं शकतो? आता ही पश्चात्तापाने नुसती जळते आहे. परपुरुषाचें चिंतन हिला कधी स्वप्नांत सुद्धा शिवलें नसतां असहायपणें पाशवी वृत्तीला मारून मुटकून हा बळी पडला आहे. तिच्या मनाची साक्ष कोण घेणार! जनदृष्टीने ती पतिता! तिच्या छळवाद्याला हें पक्कें माहीत आहे. कितीही पश्चात्ताप झाला तरी तिला स्वतःच्या घराचा आसरा परत कोण देणार?



ही पहा जुलमी कायद्यांनी व निर्दय आप्तस्वकीयांनी घडवलेली तिसरी करुण मूर्ति! चांगली कुलीन घराण्यांतील दिसते आणि असें कसें, अशा बुचकळ्यांत पडूं नका! नुसती कुलीन घराण्यांतीलच नाही तर एके काळीं तिने चांगले सुखांत दिवस घालविले आहेत. पण आता

पहा ! रानांत पडून राहिलेल्या सुन्दर जुन्या पडक्या इमारतीप्रमाणें तिच्या वैभवाच्या काळांतील अवशेष तिच्या चेहऱ्यावर दिसत आहेत. बाकी सारा येथून तेथून भयाण ओसाडपणा !

पतिनिधनानंतर पोटापुरतें मिळण्याची आशा असतां भाऊबंदांनी फसवून नागवून तिला देशोधडीला लाविलें. कायदा हा तिच्या बाजूचा नाही. मग तिची दाद कोण घेणार ? घरीं स्वयंपाकी ठेवण्याची ऐपत असतां आता कवडीवर सुद्धा हक्क न राहिल्यामुळे स्वतःच पोळपाट लाटणें घेऊन लोकांच्या दाराशीं राबते आहे. तरुण वय, सुखांत घालविलेल्या दिवसांनी राहिलेली अंगकांति आणि साधारण रूप, स्त्रीजन्माच्या जोडीला एवढीं बसल्यावर कोण्या पापिष्टाची नजर तिच्यावर पडल्याशिवाय राहते आहे ?

लोकांच्या घरीं अब्रू संभाळून काम करीत असतां तिला किती जड जात होतें ! दोन्हींकडून बोलण्याची चोरी. बरें, पोटासाठी उद्योग न करावा तर दुसरें काय करणार ? लोकांच्या तडाक्यांत न जातां दुसरें करण्याजोगें काम माहीत नाही. काम केल्याखेरीज गत्यंतर नाही. अशा स्थितींत तिच्या निराधार स्थितीचा फायदा घेऊन कोणी दुष्टाने तिच्या जन्माचा नाश केला. पण लोक काय बोलणार ? एका हातानें टाळी वाजत नाही, हेंच की नाही ? हा सारा प्रसंग टळला नसता का ? अशी उघड्यावर पडण्याजोगी का हिची स्थिति होती ? आज कायद्यानें तिला पोटापुरती व्यवस्था करतां आली असती तर हें अधःपतन टळलें असतें, पण कायदा कोठली दाद घ्यायला ?

आमच्या सनातनप्रिय दुरभिमानी मतवाद्यांनो, तुमच्या सनातन म्हणविल्या जाणाऱ्या, देवधर्म-ब्राह्मण-संमत अग्निसाक्षीने झालेल्या, या असल्या विवाहाच्या जिवंत साक्षी लक्षांत घ्या, म्हणजे तरी सनातन नांवाखाली आपण काय अनाचार अत्याचार चालूं देतों याची तुम्हांला कल्पना येईल.

   

विषम विवाहाचे इतके बोलके दुष्परिणाम इतरत्र सापडणें कठीणच. आज ह्या मुलीला नवऱ्याच्या घरीं नांदली नाही म्हणून समाज दोष देतो आहे. पण असें कां याचा विचार केला आहे का ? लग्न झालें असतां परक्या पुरुषाबरोबर पळणाऱ्या ह्या पोरीला समाज नाही तीं दुर्विशेषणें देऊन उल्लेखितो आहे. समाजबंधना-करितां तीं सर्व योग्यच आहेत, असें कोणी समंजस सहज म्हणेल. पण जीं बंधनें पाळावीं अशी इच्छा असते तीं खरोखर पाळण्याजोगीं आहेत की नाही ह्याकडे लक्ष देणें जरूर नाही का ?

ज्या वेळीं विवाह म्हणजे दागदागिने घालणें, नटणें मुरडणें, नांव घ्यायला सांगितलें की लाजणें, चार दिवस सर्वांच्या डोळ्यांत भरेल असें नावीन्यपूर्ण महत्त्व प्राप्त होणें यापलीकडे कांही नाही, असें वाटत होतें, त्या वयांत सारें ठीकच होतें. म्हातारा काय नी तरुण काय, पण त्याच म्हाताऱ्याच्या कामचेष्टांनी व वाढत्या वयाने उत्ते-जित झालेल्या तरुण मनाला 'अंग गलितं' 'पलितं मुंडं' हें चित्र कितीसें मनोवेधक वाटणार ! फुलपाखराप्रमाणें कोश फोडून नुक-त्याच जाग्या झालेल्या मनाला असलें वैवाहिक आयुष्य नांवाचें वैवाहिक वाटून मनाची जास्तच उपासमार होऊं लागली व चंचल मन इष्ट वस्तूच्या शोधार्थ अविचाराने धावू लागलें. पोरी, हा अविचार तर खराच. पण त्यापेक्षा तुला ह्या अविचाराला वळविणाऱ्या तुझ्या स्थितीचीच मला कीव जास्त येते. पानावर बसवून भूक लागली असतां जेऊं नको म्हणण्याइतकेंच तें चमत्कारिक आहे. पण हें का कोण लक्षांत घेणार आहे ? स्त्रीला स्वतंत्र मनोभावना नाहीतच. म्हातारा, तरुण, कसाही असो, त्याची भोग्य वस्तु स्वतःचा विचार न करतां होणें, एवढेंच स्त्रीचें काम. खरंच परमेश्वराने स्त्रीला उत्पन्न करतांना स्वतंत्र मन घातलें नसतें तर—

   

ही पहा गरिबीला कंटाळलेली व सुखाच्या भपक्याने कातेरी

शय्येचा आश्रय धरणारी स्त्री ! तिच्याकडे पाहून नाक मुरडावें असें सहज वाटतें आहे, पण जरा थांबा आणि विचार करा. तिचा दोष तर खराच, पण लग्न करून वैवाहिक सुखाचा सरळ धोपटमार्ग सर्वांस मोकळा असता तर तिची अशी स्थिति झाली असती का ? पुर्नविवाह आता रूढ झाले आहेत हें खरें, पण अजून किती अपवादात्मक ? पुर्नविवाहेच्छु स्त्रीला अजूनही धाडसच करावें लागतें. शहरासारख्या ठिकाणीं ही स्थिति तर खेडेगावांत इतरत्र विचारच करणें नको. खेडेगावांत जन्म गेलेला. लग्न म्हणजे काय हें कळायच्या आधी कितीतरी लहानपणींच नवरा वारलेला, तारुण्यांत पाऊल टाकतांना मनांत येणाऱ्या अनेक संमिश्र भावनांचें सुखस्वप्न पाहणें सुद्धा जिला पारखें झालेलें, घरची गरिबी, कसलीही हौस पुरण्याची आशा नाही, मन इतरत्र गुंतवायला कसलाही मार्ग मोकळा नाही, अशा स्थितींत विश्वामित्रासारख्या तपस्व्याला सुद्धा हजारों वर्षांच्या तपोभ्यासानेही जें साधणें कठीण गेलें तें हिच्यासारख्या अनभ्यस्त व नुकतेच डोळे उघडून कुतूहलपूर्ण नजरेने पाहूं लागलेल्या मनाला साधणें किती कठीण आहे ? चोहोंकडून कोंडमारा झालेला, गरिबींतच नुसती वेणीफणी नीटनेटकी करून राहिली तरी लोक हसणार, त्याचा हा परिणाम पहा.

बांध फोडून वाहूं लागलेला हा ओघ कसलाही विचार न करतां मुसलमानाचा हात धरून खाली नरकांत खोल उडी घेत होता. आज आश्रमांत येऊन तात्पुरती तिची सुटका झालेली आहे. पण पुढे काय ? खरोखरीच अशा स्त्रियांचें काय करायचें ? वैवाहिक सुखाची इच्छा असतांना कोणत्याही कारणाने कां होईना त्याचा सरळ धोपटमार्ग बंद झालेला. मनावर तितका ताबा राहिलेला नाही. एकदा पाऊल चुकलेलें. जन्माने स्त्री; त्यामुळे फिरून मान वर करून चालणें तिला या जन्मीं शक्य नाही ही जाणीव तिला नाही काय ? पुरी जाणीव आहे. समाज आज तिच्याकडे कोणत्या दृष्टीने पाहतो आहे तें तिला पुरं माहीत आहे. तिला पाहिजे तें सरळपणें मिळत नाही.

किंबहुना म्हणूनच त्याविषयीं अधिकच लालसा उत्पन्न होऊन तिची वृत्ति किती तरी वेळां बेफाम होते. तिचे बेफाम वृत्तीचे शब्द कधी तुम्ही ऐकले आहेत कां ? "आता मी चांगली राहिलें काय, वाईट राहिलें काय, लोक माझ्याकडे कोणत्या दृष्टीने पाहणार ? असा कोण आहे की जो हात देऊन मला सरळ मार्गाने नेईल ! मग मी माझ्या मनाला वाटेल तसें कां करूं नये ? एवी तेवी लोक हसणारच, मग भीड कोणाची ?" खरेंच आहे. एकदा वस्त्र मलिन झाल्यावर आपण कुठे बसलों, काय बसलों, याची कोण परवा बाळगतें ?

आज जो समाज तिला पतिता म्हणून लाथाडून बाहेर टाकतो आहे त्याच समाजाला तिचें आत्यंतिक पतन, तिच्या अब्रूचा बाजार उघडया डोळयांनी पाहवतो ! मग तिला समाजांत व्यवस्थित स्थान मिळूं शकतें. पण त्यापूर्वी ? छे ! मग समाजाचा सोवळेपणा कोठे राहिला ?

   

या भडक चित्रावरून दृष्टि काढून हें दुसरें चित्र पहा. दुर्दैवाचा याहून कठोर घाला कोठे पहाल ? अजून तोंडावरचा पोरपणा सुद्धा गेला नाही अशा वयांत—छे, कल्पनासुद्धा करवत नाही. क्षणीं अल्लडपणें खेळावें बागडावें, क्षणांत यौवनांत प्रवेश करूं लागलेल्या मुग्ध मनाचीं अस्फुट, गोड स्वप्नें पाहावीं, लाजावें, हेंच नव्हे का हें वय ? पण तो खेळकरपणा, आनंद, कुठे दिसतो आहे ? या कोवळया चेहऱ्यावर अकालिक उदासीनतेची छाया का दिसते आहे ? अजून आयुष्याची कळी पुरती उमलली सुद्धा नाही तोंच तीवर कीड कुठून पडली ?

बाल्यसहज निष्पाप मन असणें हा सुद्धा गुन्हाच का ? पण ज्या ठिकाणीं विश्वासाने मान ठेवावी त्याच ठिकाणीं गळा कापला गेला तर चौदा वर्षांची पोर करणार तरी काय ? जाणार कोठे ? पाहणार कोणाकडे ? "बाई, तुझें भावजयीचें नातें. आईबाप वारल्यावर तूं या पोरीला आईच्या ठिकाणीं. तूं हें काय केलेंस ? तुला पैसे मिळवायला या मुलीच्या अब्रूचा विक्रय करण्यापलीकडे दुसरा धंदा नव्हता

का ? पैसेच हवे होते तर हिला चार कामें करायला कां नाही सांगितलींस ? त्याने तिच्या जीविताचा असा सत्यानाश तरी झाला नसता ! पण हा भलता व्यापार तूं कोठून आरंभलास ? लोकांच्या नांदत्या नंदनवनाचें भकास रान करून टाकावयाचें, निष्पाप कोवळ्या बालिकांना माया लावून फसवून त्यांचें आनंदमय जीवित विषवत् करून टाकावयाचें, हाच एक धंदा तुला करतां येतो ? तुझ्यासारख्या शिष्ट मायावी बायकांची समाज दाद तरी केव्हा लावून घेणार ? हा सर्रास चाललेला अनीतीचा व्यापार बंद तरी केव्हा करणार ? आणि तोंपर्यंत अशा किती कोवळ्या कळ्या कुसकरल्या जाणार !"

   

पुरुषाच्या सैतानी वासनेला बळी पडलेल्या ह्या चित्रांवरून डोळे फिरत असतां दुष्यंताच्या दरबारीं आलेल्या शार्ङ्गरवाप्रमाणें अपरिचित मन उबून जातें. स्त्रियांवर घडणाऱ्या सामाजिक अन्यायांच्या ह्या जिवंत साक्षी मृतात्म्याप्रमाणें ओसाडींतून एकाकी डोळ्यासमोर उभें राहून मनाला भेदरवून सोडतात. स्त्रीपुरुषसंबंधांतील प्रेम, पावित्र्य, गांभीर्य, आनंद हे सारे स्वप्नांतील शब्द तर नव्हेतना, असें वाटूं लागतें. विषयवासना—मनाला मारून पावित्र्य, आनंद, यांचा घोट करून नुसत्या जड कुडीवर धुडगूस घालणारी पाशवी वासना—हेंच तर त्याचें अखेरचें उघडें स्वरूप नव्हे ना, अशी शंका यायला लागते ! सारा प्रकार कल्पनेंत सुद्धा विचार करूं नये—इतका किळसवाणा वाटतो. पण ? बऱ्याचशा अशा गोष्टी आपण आंधळ्याचें सोंग घेऊन चालतों म्हणूनच चालत आल्या नाहीत काय ?

'पतित स्त्री' एकटीच गुन्हेगार असूं शकेल काय ? पतितेविषयीं विचार करणें इतकें अशक्य नाही, तर खरोखर तिच्या बाबतींत समाजाची उपेक्षणीय, कुत्सित व अनुदार वृत्ति ही विचार सुद्धा करूं नये इतकी अन्यायी जुलमी आहे !

पुरुषाने आपल्या क्षणिक भोगलालसेच्या तृप्तीसाठी तिला बळी

घेऊन, काम संपतांच तिला झिडकारून लाथाडून दिली! आज सर्व स्त्रीजात जातिबहिष्कृताप्रमाणें तिची नुसती गोष्ट सुद्धा विचारांत घ्यायला तयार नाही. देवादारीं तिला ठाव नाही. अशी स्त्री-पुरुषांनी टाकलेली, समाजाने उपहासिलेली, एकाकिनी, निःशब्द उश्वासांनी समाजाला आपल्या अन्यायाची जाणीव करून देत आहे.

विषयलालसेने निर्दय झालेल्या पुरुषाची ही कृति पहा. हिला निर्लज्ज व बेशरम या शब्दांनी डागण्या देत असतां, तो काचेचा पेला कोणी फोडून टाकला? खऱ्या प्रेमाला पारखी करून तिच्या मनावर रात्रंदिवस जळजळीत निखारे कोणी ठेवून दिले? स्त्रीच्या ठिकाणीं स्वाभाविक वसत असलेल्या मातृवात्सल्याला करपवून टाकून मातृत्वाच्या आनंदाचें सुखस्वप्न मृत्यूपेक्षाही भयंकर कोणी करून टाकलें? —याचा विचार कोणी करीत नाही. इतक्या साऱ्या गोष्टींना कारणीभूत होणारा तिच्या पापांतील तिचा जोडीदार कोठे आहे? का जन्माने पुरुष असल्यामुळे 'अपापानां कुले जाते मयि पापं न विद्यते' असें तर त्याला वाटत नाही ना?

सामाजिक न्यायान्यायाचा खोटा एकांगी काटाच स्त्रीच्या या दुरवस्थेला कारणीभूत होत आहे. पतिता स्त्रीचा हा प्रश्न अनाथ-महिलाश्रमांनी सुटणार नाही. अनाथ बालकाश्रम काढून भागणार नाही. त्याला समाजाचा दृष्टिकोनच बदलला पाहिजे. पण तोंवर?

तोंवर स्तब्ध बसून निर्दय कायदे, जुलमी रूढि, कुटिल आसुरी वृत्ति व खोट्या कल्पना यांचा नंगा नाच असाच चालूं देणार!

आक्टोबर १९३१

दृश्य दहावें

# फिरून तुरुंगांत

सहनशील–सहनशील म्हणून नांवाजलेल्या भूमातेच्या उदरांतले मुके कढ भूकंपाचे धक्के बसल्याखेरीज आम्ही लक्षांत घेणारच नाही का? पण आयत्या वेळीं सावरूं पाहूं तों वेळ निघून गेलेली असेल. आणि आजूबाजूला नाश–नाश–ह्याशिवाय एकही शब्द ऐकूं येणार नाही—

मी असें नाही म्हणत की ग्यानबाचा कांही दोष नाही म्हणून त्याने खुनाचा प्रयत्न केला–नव्हे तो खुनी असेल. आता दरोडेखोरीही केली असेल! पण–पण–हें सारें करण्यापूर्वी त्याने शेवटच्या करुणार्त हाकेने समाजाच्या हृदयाला पाझर फोडण्याचा प्रयत्न केला. आणि त्या आर्त हाकेला उत्तर काय मिळालें? उपहास अपमान—! खोल दरींत घसरत जाण्यापूर्वी त्याने सावरण्याचा प्रयत्न केला. पण त्याला लाथाडलें गेलें. आणि आता तो मेलेल्या नजरेने समाजाकडे पाहूं लागला तर त्यांत दोष कोणाचा?

बाकी सागराच्या प्रचंड कल्लोळांत दर लाटेबरोबर कितीतरी गाळ किनाऱ्यावर बाहेर टाकला जातो, पण त्याला त्याची कधी परवा वाटली आहे का?

ग्यानबाला समाज हा शब्दसुद्धा कळत नाही, पण आजचे त्याचे उद्‌गार कंठरवाने काय सांगतात ? चार दिवसांपूर्वी ज्या समाजाची त्याने एवढी करुणा भाकली त्याच समाजाला लाथाडून तो आता समाजाचा शत्रु झाला आहे ! त्याने आपण होऊन तुरुंगवास पत्करला. ज्या स्वतंत्रेची चारी खंडें मुक्तकंठाने स्तुतिस्तोत्रें गातात ती स्वतंत्रता आपल्या हाताने फेकून देऊन तो चोरी करून कैदीखान्यांत येऊन दाखल झाला. यापेक्षा दुसरा पुरावा कशाला ? अजून त्याचें मन पूर्ण थिजून गेलें नव्हतें, आंत थोडी धग होती, म्हणूनच माझ्या सहानुभूतीने तें द्रवलें व तो मला स्वतःची कहाणी सांगूं लागला.

   

"बाई, मी कांही जन्माने दरोडेखोर नाही. चांगल्या एका म्हराठ्याच्या कुळांत माझा जन्म झालेला. थोडीफार घरची जमीन पण होती—पण ती गेली दुष्काळांत, अन् रोजमुरा करूं लागलों. पर अजून त्ये दिवसांची आठवण झाली की, वाटूं लागतया की ग्यानबा अरं तूं कुठं होतास अन् कुट आलास ह्या नरकांत ! अरं तुला काय नव्हतं ! अशी खुपसुरत घरधनीण होती ! जवा का ती न्याहारी डोक्यावर ठेवून साऱ्या बायकांबरोबर ठुमकत येई त्ये वेळेला अक्षी तिच्यावरून नजर काढूं नये असेंच वाटे ! त्ये वेळेला मला कळतं की अरं ही घरांत नांगीण र नांगीण शिरली आहे, तर तवांच ठेचून काढली असती. पर झालं गेलं आता काय त्येचं. मला तिचं नाही मला एवढं वाटत. एक गेली तर ग्येली, तिच्या उरावर छप्पन आणल्या असत्या ! पर माझी येणू—माझी येणू मला कशी परत मिळेल ?

"बाई, फार नाही बोलत, अक्षी नक्षत्रावाणी पोर होती. बामणाच्या पोरी तिच्यापुढे फिक्या पडायच्या—! सांज झाली की तान्ह्या गाईवाणी मी घरीं जावं. तिला जवळ घ्यावी, कुरवाळावं म्हणजे अक्षी दिसाभराचा शीण हारपल्यासारखा वाटे. माझी येणू तिलाबी लळा माझाच ! अंगणांत दिसलों की धावत येऊन गळ्याला मिठी घालायची.

तिला उचलून घेतलें की आनंदाने आंत कसं कसं उधाण येवाचं ! खरोखर त्ये दिवसांत माझ्यापर राजा बी सुखी नसेल.

"आणि बाई तुम्हीच सांगा अक्षी अशी चिमणीवाणी माझी पोर आजारी पडली, लाहीसारखी तडफड करूं लागली, तर कोण्या बापाला चैन पडेल ? दहा दिवस झाले, डोळ्याला डोळा नाही. अक्षी मासळीवाणी तडफडे. देवी खेळवली, वैद्याला बोलावलें, नवस केले, पर गूण नाही. लोकं म्हणूं लागलीं अक्षी डाक्टरचा दवा करून पहा. तो डाक्टर दहा कोसावर. गेलों तिथं, त्याच्या पाया पडलों. न्हाईन्हाई त्या आराधना केल्या, पर तो आपल्याच कामांत. त्याला कशाला गरिबाची कीव येतीय्. रुपय आण आणि मग माझ्याकडे ये; तोंपर्यंत येऊं नकोस, हें त्याचें एक उत्तर. त्याच्या दाराशीं धरणं धरून बसलों पर न्हाई आली त्याला कीव !

"जेथे दहा रुपयाचा कागुद वर्सांतून नाही नजरे पडायचा तेथे गरीबानं दहा रुपय कुठून आणाव ? नाइलाज झाला. घरीं गावाला जायला निघालों पर तेथं तरी पैसे कोण देणार होतं ? मला लई फिकीर पडली. आणि तवांच माझ्या दुर्दैवानं बघा वाटंत फेरीवाला भेटला. आन् खोटं न्हाई बोलत, जिवाला मोह पडला. पर बाई एवढं बरीक सांगतों तुमच्या पायाला स्मरून की त्यानं मला गोडीगुलाबीने पैसे दिले असते तर कवाच त्येच्या अंगावर हात टाकला नसता. त्येलाबी लई सांगितलं, त्येची आराधना केली. पायां पडलों. काय हवं तें कबूल केलं. खोटं नाही सांगत. त्यानंच कचेरींत सारं कबूल केलन हें. बुकांत सुद्धा लिवलाय तेथ—(मला त्याच्या सांगण्याचें हसूं आलें)—पर तो न्हाईच म्हणे. तुझ्याकडली आधीची रक्कम दे मग देतो—आणि त्येचे हे बोल ऐकून माझा राग लई अनिवार झाला. डोक्यांत अक्षी अंथरुनांत पडलेली माझी पोर दिसूं लागली. "बाबारं मला बरं कर रे बाबा बघ–रे" म्हणून तिचे शबुद ऐकूं येऊं लागले. दुसरं मन बोले अर तुझ्याजवळ दहा रुपये कुठं हायती—

पैसा नाही मग कुठले पोरीचे प्राण ! असं कोणी तरी आंत बोलूं लागलं. माझं मलाच भान राहिलं नाही-तेथल्या तेथे मारला फटका. नी त्यो काय फटक्यासरशीं बेसुध झाला. मला तर वाटला मेलाच ! एकदा वाटलं मारुन टाकावा. पर येवढी सुध होती कोणाला ? त्यांतून रस्ता रहदारीचा. कोणी यायचा ! कमरेचा कसा काढून घेतला, त्याला दिला निवडुंगांत टाकून नी पळालोंच; पर असं पाप थोडंच लपून राहयचं !

"थोडे दिवसांनी त्यानं अक्षी मला कोडतांत खेचलंच. अब्रू गेली. गावांत जो तो चोर चोर म्हणून छी:थू करूं लागला. खून क्येला बोलूं लागले, सा वर्षांची सजा बी झाली. पर माझी येणू बरी झाली येवढ्या आनंदांतच मी सारं सारं गिळून टाकलं. आन कोठडींत जाऊन दडलों.

"बाई पहिल्या पहिल्यानं वाटे आज घरधनीण येणूला घेऊन येईल, उद्या भेटायला घेऊन येईल, पर न्हाईच. एक दिसबी ती × × माझ्या पोरीला घेऊन न्हाई आली. लोकं समजूत घालीत. अर ग्यानबा येडा तर न्हवस तूं. अरं तूं कुठं ? तुझं गाव कुठं ? इतका गाडीचा प्रवास करून बाईमाणूस हत कसं येईल. जरा श्येनपणा तर धरशील ! काय करणार ? आपला चूप बसून राहिलों पर चैन पडेना. अक्षी एक एक दिवस नी रात मोजून काढली. जिवाला जरा ग्वाड वाटेना. येथं काय माणसानं राहयचं काय ! पर आपण केलं त्येचं फळ कोण दुसरं भोगणार ? कसं तरी दिवस काढल ! केवढी कडक शिक्षा ! केवढं काम !–पर एक दिवस कधी वांधा नाही केला. मनांत इच्यार केला, ग्यानबा केलंस तेवढं पुरं. पर आता करूं नको–एक दिवस वाडानें येऊन सांगितलं, ग्यानबा तुझी दोन म्हहिनं शिक्षा कमी केलीय. मनांत अक्षी अस्स बरं वाटलंय म्हणून सांगूं ! जणूं सारं शेत फुलूनच आलंया. 'येणू, माझी येणू. आता भेटणार.' मनांत बोललों. 'पोरी, तुझ्या बापाला वळखशील की न्हाई म्हणशील ?'

"अख्खा दिवसरात चाललों सुटल्यावर. भाकर ग्वाड लागेना. कांही सुचेना. अक्षी निघून आलों गावाला–गावाच्या शिवेशीबी आलों नी असं गाडीच्या बैलावाणी पाय घराकड ओढ घेऊं लागलं. गावांत शिरलों तों दिवेलागणीची वेळ झाली व्हती. कोणी पाणी भरीत व्हत्या, कुठं पोरं आंगणांत खेळत होतीं. पर त्येचं मला काय ? तान्ह्या गाईच्या कांसेला रग लागावी तसं माझं झालं व्हतं. त्येला आणखी पान्हा कशाला हवा. हकड बघितलं न्हाई, तकडं बघितलं न्हाई, सरळ गोफणीच्या दगडावाणी भिरभिर घराकड आलों. पर अंगणाशींच थबकलों ! चार पोरंबाळं आंगणांत कुत्र्याच्या पिल्लावाणी मस्त एकमेकांच्या अंगावर लोळत होतीं ! घरांतील घरधनीण चुलीपाशीं करीत होती. सगळं कसं लई गोड दिसत होतं. पर–पर–माझं न्हव ये घर ! चुकलों तर न्हाई ? म्हणून एकदा खाणाखुणा नीट पटवून पाहिल्या. घर तर ह्येच ! अक्षी धीर धरून इचारलं. "अरं येथं राधा म्हराठीण राहाती न्हव"–घरांतील बाई पुढं आली.

'राधा म्हराठीण–बाबा येंथं न्हाई राधा म्हराठीण.'

'येथच तर राहत व्हती. कुठ गेली बाबा ! सा वर्षापूर्वी येथंच तर व्हती. तिला येणू येणू म्हणून एक चार वर्साची पोर व्हती बघा !

'हां, हां ती व्हय–हात्तिच्या ती तर कवाच गेली दुसरा नवरा करून–'

"बाई, अक्षी पाठीमागून येऊन कुणी उपट घातल्यावाणी मला झालं. मी तुरुंगांत तिकडं कष्टांत दिवस काढतोय आणि ह्ये दुसरा नवरा करून गेली !

'अन् तिची पोर––'

'पोर तर कवाच मेली ! त्येच्या बापास्नी ६ वर्षांची सजा झाली. सजा झाली त्येच आखाडांत तर प्वोर दगावली. असा पापाचा पैसा कुठं फळाला येतो व्हय ! '

"बाई तिचा शबद तवां मी पुरा ऐकला बी न्हाई. सारं आभाळ माझ्यावर कोसळून पडलं, हातापायांतला जीवच गेला. मी मटकन् खाली बसलों, तिनं मला वळखलं नव्हत पर आता वळखलं.

'अरं तूं तर ग्यानबा.'

"व्हय, होय मावशे मी त्यो ग्यानबाच, पर तूं कुठं वळखलस—मी मनांत म्हटलं !

"त्ये दिवसापासून असं डोकं भ्रमल्यावाणी झालं. कशावर जीवच लागेना. कांही करावंसं बी वाटेना. अक्षी वेड्यावाणी गावभर भटक भटक भटकावं. मिळेल तें खावं. थकलं की निजावं. पाटलानं दोनदा बोलावूनबी सांगितलं, 'ग्यान्या तूं हजिरीबी देत नाहीस वेळेवर येऊन—भटकतोस. बघ याद धरून राहा. नाही तर बघ !' सगेसोयरं बोलू लागलीं, 'तूं असा गावभर भटकतोस नी गावांत समद्यास्नी तुझी गोष्ट म्हाहीत हाय. त्ये बोलतात नी आम्हांस्नी कमीपणा येतो.'

"बाई, मी पर काय करणार ? कितीक जागी काम शोधलं पर मला ठेवून कोण घेतो. कोणी म्हण अन्नावारी राहा, कोणी म्हण कांई, कोणी म्हण काई, इतकं करून त्ये चांगलीं, अन् वाईट काय तो मी. शेतावर अक्षी धान्य कमी भरलं की बोलावं हा ग्याना आला ना ! कुठं कोणाचं हरवलं की पाटलानं बोलवावं हडसून खडसून विचारावं. जसा कांही जन्माचाच चोर व्हतो ! त्येला हृचे कळेना, अरं ज्याने केल्या पापापायी पोरगी गमावली तो कशाला फिरून चोरी करील ! अक्षी खरं सांगतों बाई मावशीचा त्यो शबुद या अंतरांत खोदून ठेवला व्हता मी. अक्षी कोणाच्या सुतळीला बी हात लावला न्हाई. पण माझें कोण ऐकतो ! शेतावर अक्षी गडी माणसानं चोऱ्या कराव्या आणि माझ्यावर घालावं. पर ते सच्चे, मी लुच्चा. जगांत उलटा न्याव हाय. सापडला तर चोर न्हाई तर साव. आमच्या एका मामलतदाराच्या लेकानं एका बाईचा खून केला. अक्षी समद्या गावाला माहीत व्हतं ! पर कोण बोलणार ! सगळीं गप्प. कायदा

गरिबाचा काळ. शिरिमंतांनी पैसे भरलं की कसा गप्प. बाई चोर झालों म्हणून काय मला मन न्हाई काय! त्येला सांगावंसं वाटे, अरे त्येकांनो तुमच्यासारखीच माझी कुळी ना. मला काय खरं खोटं कळत न्हाई व्हय......

"लई काय सांगूं, अगदी शनीच्या पोथीवाणी कथा.

"एकदा अक्षी पाटलाची पोर सजून दारांत बसली व्हती. अशी गोड दिसत होती—मला माझ्या येणूचीच आठवण झाली. हातांत आंबा होता, म्यां तिला दाखवला. पोर बिगी बिगी धावत आली. आंबा घेतला नी मला काय बुद्धि झाली पहा की, तिचा पापा घ्यावा! म्हटलं माझी येणू असती तर तिनं पापा नसता का बापाला दिला! म्हणून पापा घ्यायला तिला वर उचलली मात्र नी अशी तिने किंकाळी ठोकली की सारं घर धावून आलं. त्येंना वाटलं मी पोरीच्या दागिन्याकरतांच पोरीला उचलली. आणि माझ्यावर त्यांनी जो गहजब केला म्हणून सांगूं! मी लाख बोललों पण ऐकून घेतो कोन! बाई, माझ्या पोरी-वाणी असणाऱ्या त्या लहान लेकराला का मी मारलं असतं? पर माझ्यावर विश्वास कोण ठेवतो! 'चोर तो चोर आणि शिरजोर!' असंच साऱ्या लोकांना वाटलं. पाटील घरीं आला. त्येला कळल्यावर तर रागानं लालच झाला. त्येंच्या पायाची शपथ घेऊन सांगितलं. गाईची शपथ घेतली, पर न्हाईच. चाबकाखाली त्याने उभं फोडून काढलं. ते दोन दिवस आंग ठणकत व्हतं. तिसऱ्या दिवशीं उठलों नी वैतागानं गाव सोडला. पर काय? दुसऱ्या गावीं अक्षी शिपाई माझ्या मागोमागच. म्हन गाव का सोडला—कुठं व्हतास—काय केलंस. चोर झाला म्हून काय त्येच्या अंगाला लागत न्हाई की उराला बोल झोंबत न्हाई! पण त्ये कोण लक्षांत घेतं. अस एक ना दोन—जिथं दैवानंच दावा मांडला तिथं काय! कोणी अक्षी मरुंबी देईना की जगूं बी देईना.

"त्येथून पाटलाला सांगून आलों शेहरांत. येकाने सांगितलं की, येक बावा सुटलेल्या लोकांना देतो नोकरी लावून, ग्येलो त्याचा पत्त्या

काढीत. पर बाई तेथबी त्येच. त्ये बाबानं घरांतच ठेवून घेतलं. दिवसभर अक्षी मरमरपर्यंत काम करून घ्यावं, पर पोटभर अन्न सुद्धा देऊं नये. एक दिवस बोललों मालकिणीला. तिनं साहयबाला काय सांगितलं कोणास माहीत. एका संध्याकाळीं जवा का तो तर्र बनून आला आनि मला लाथाबुटाखाली बडवबडवलं तवां अक्षी मनांत निश्चय केला आता बाहेर राहयचं नाही. ग्यानबा, एकदा चोरी केलीस ना दुसऱ्यांदा कर. अरं सापडली तर चोरी न्हाई तर हायच चंगळ. त्येका एवढा सारा छळ कशाचे पायीं!—पर लगेच येणूची आठवण येई. देवानं मला शिक्षा क्येली—माझी बरी झालेली प्वोर काढून नेली—आता आणखी किती पापाचे रांजण करशील?—चोरी करावीशी वाटेना पर येकायेकात्रं तोंड बी बघावंसं वाटेना. मनाचा धडा केला नी तस्सा तडका जेलर साहेबाकडे आलों. त्येच्या पायां पडलों. त्येच्या विणवण्या केल्या, साहेब मला कैदेंत ठेवून घ्या म्हणून. पर तो घेईना. त्येनं लाथाडलं, त्यानं शिव्या दिल्या. सरकारन काय अन्नछत्र उघडलं काय, म्हणून बोलला. मग काय करूं—गेलों बाहेर, घातला दरोडा, नी आलों येथं. सांगा बाई—येथं काय वाईट हाय. निदान बाहेरच्या वाणी तरी न्हाई. येथे सारेच चोर! बाहेर तसं न्हाई. लेकाचे चोर असतात, कसाब असतात. पर काय आणतात सावाचा अवतार. त्ये तरी येथं नाही."



त्याची हकीकत विलक्षण तर खरीच. असलीं उदाहरणें नेहमीच सापडतील असं नाही. पण त्याने मला कसें अस्वस्थ करून टाकलें! जेलरने मला ही शेवटची हकीकत सांगितली होती, पण ती किती निराळ्या तऱ्हेने. आपल्या व्यवस्थेची तारीफ करतांना पुरावा म्हणून त्याने सांगितलें की सुटलेले कैदी इतके खूष असतात की परत तुरुंगांत येऊं चाहतात!

जुलै १९३२

दृश्य अकरावें

# ज्युव्हेनाईल कोर्टांत

चला हें एक नवें खूळ पाहूं या; याच भावनेने आम्ही सर्वजणी आज या कोर्टांत पोचलों होतों.

वास्तविक नेहमीच्या कोर्टाप्रमाणें तेथलें वातावरण पोलिसी दंडुक्याचें मुळींच नव्हतें. तरी पण तें न्यायासन आहे आणि अपराधी म्हणून सापडलेलीं मुलें त्या न्यायासनासमोर खेचलीं जातात ही जाणीव आम्हांला सुटत नव्हती.

कोर्टासमोर एक एक मुलगा येत होता. आम्ही बसलों होतों तेथल्या दाराच्या फटींतून दुसऱ्या एका खोलींत ज्यांची चवकशी व्हावयाची आहे अशीं कमींत कमी वीस तीस मुलें तरी दिसत होतीं. पलीकडल्या कोपऱ्यांत कांही मुली असाव्या पण त्या आम्हांला दिसत नव्हत्या. तरी दिसत असलेलीच संख्या काय कमी होती! एवढ्या कोवळ्या वयाचीं इतकीं मुलें कोणत्या ना कोणत्या अपराधावरून न्यायासनासमोर खेचलीं जातात, हें दृश्यच सुखी आयुष्याने स्थितप्रज्ञ बनलेल्या आमच्या मनाला धक्का द्यावयाला पुरेसें होतें.

कोर्टासमोर केस आली की, त्या मुलाकडे आम्ही कुतूहलाने पाहत असूं. फटींतून दिसत असलेल्या मुलांकडेही आम्ही किती

वेळां नजर टाकली असेल. एखाद्या मुलाचा अपराध काय हें कोर्टाला समजावून देऊन जेव्हा त्याच्याविषयीं पुकारा होई तेव्हा आंत येणाऱ्या त्या वामनमूर्तीकडे एखादी वस्तु जशी प्रत्येक कोपऱ्याने न्याहाळावी तशी त्याच्या बोलण्याचालण्यापासून प्रत्येक गोष्टीकडे आमची नजर वेधून राही. थोडक्यांत म्हणजे खरोखर हीं मुलें आमच्यापैकीच आहेत कां मानवजातीच्या दुसऱ्या कोणत्या प्रकारापैकी आहेत, हें आम्ही आमच्या मनाशींच न कळत शोधून पाहत होतों. वास्तविक तीं आमच्या मुलांच्या सारखींच मुलें आहेत हें आम्ही जाणून होतों. पण त्यांच्यावर आलेला आरोप, त्यांचे कपडे, दैन्यावस्थेंत वाढत असल्यामुळे जीवनकलहांत अकालींच प्राप्त झालेली व्यवहारी नजर, झगडण्याकरतां थोडासा कात्रेबाजपणा व उद्दामपणा—हें सारें पाहिलें की आमच्यांत त्यांना मिसळून घेण्याची आमची तयारी होत नव्हती. समाजाच्या घाणींत वाढत असतांही त्याने दबून न जातां पावसाळ्यांत उकिरड्यावर उगवणाऱ्या हिरवळीप्रमाणें त्यांतूनही जगण्याचा आनंद लुटण्याची टवटवी व हुषारी पाहिली की ती आम्हांला पाहवत नसे. तेथे परमेश्वर नसून सैतानच वावरतो आहे असें वाटे. याच दृष्टीने आम्ही त्यांच्याकडे पाहत होतों. इतक्यांत एका चांगल्या पांढरपेशा वर्गांतील मुलीचें नांव पुकारलेलें मला ऐकूं आलें.

"अं हें चांगलें वरच्या वर्गांतलें आडनांव दिसतें," मी हळूच शेजारच्या बाईजवळ उद्गारलें.

"शांता इकडे ये." वरच्या बाईंनी हाक मारली व त्याबरोबरच एक चांगली पांढरपेशा घराण्यांतील दिसणारी १६–१७ वर्षांची मुलगी कोर्टासमोर येऊन उभी राहिली. त्या मुलीच्या न्यायासनासमोर येण्याने आमच्या कल्पनांना खरोखर चांगला जबरदस्त धक्का दिलेला होता. आतापर्यंत हीं मुलें असलीं तरी आमच्यापैकी नव्हत म्हणून त्यांना त्यांच्या तऱ्हेने पाहावयास आम्ही तयार होतों. पण आता तसें नव्हतें.

ही पोरगी आम्ही बाजूला ढकलून काढूं शकत नव्हतों, तिचा

चेहरा, तिची राहणी, बोलणें, नव्हे तिचें पातळ, कानांतील कुडीं, बांगड्या, फार काय केसांची वळण सुद्धा ती आमच्यापैकीच एक आहे असें स्पष्ट सांगत होती. आणि इतकें असूनही अपराधी मनाची लाज तिच्या नजरेंत दिसत नव्हती. दोषी असतांना चेहेऱ्यावरचा शिरजोरपणा या मुलांना शोभला. तीं तसलींच होतीं. पण हिला...

न्यायाधीशाचा निकाल लागण्यापूर्वीच आम्ही तिला दोषी ठरवलें.

हो, दोषी नसती तर तेथे कां येती ? कांही तरी काळेबेरें असलेंच पाहिजे—

"एका माणसाबरोबर घरांतून पळून जात असतांना पोलिसांनी तिला पकडलें." वरून खाली माहिती येऊं लागली.

"दोषी" असा आमचा तिच्यावरचा निर्णय आमच्या मनांत ठरून गेला.

"इकडे तोंडावरची माशी सुद्धा जोराने मारून उडवणार नाही पण पाहावें तों धाडस कोण !" एक जण कुजबुजली.

"बहकलेली असेल कादंबऱ्या नाटकें वाचून." दुसरीने साथ केली. वास्तविक तिच्यांत विशेष असें कांही नव्हतें. पांढरपेशा वर्गांतील चारचौघीपेक्षा कांही ती खास निराळी नव्हती. पण कोर्टासमोर आलेली आणि तीही एका दुसऱ्या जातीच्या माणसाबरोबर पळून जातांना—

आमचीं मनें तिच्याविषयीं वाटेल तें ऐकायला व त्यावर विश्वास ठेवावयाला अगदी पूर्ण तयार होतीं. घरांतून मुलगी पळून जाते आणि ती सुद्धा इतर जातीच्या माणसाबरोबर–! मुलीच्या गैरवागणुकीचा यापेक्षा सबळ पुरावा तो कोणता असायला पाहिजे.

"शांताबाई, तुम्ही त्या इसमाबरोबर मुंबईला पळून येण्यापूर्वी मध्यंतरीं त्याच्याजवळ कोठे राहिलां होतां काय ?"

"नाही. आम्ही परवा घरून निघालों तशीं तडक मुंबईलाच आलों. मी तर रात्रीं घरूनच स्टेशनवर टांगा करून आलें आणि

तेथून आम्ही निघालों."

"हां, पण तुम्ही घर कां सोडलें ?"

"बाबा यांच्याशीं मला लग्न करूं देत नव्हते म्हणून !"

"लग्न करून देत नव्हते–ते कां ?"

"मला एक श्रीमंत, पैसे देणारें स्थळ सांगून आलें होतें. बाबांना पैशाची नेहमीची अडचण असते, तेव्हा बाबांनी मला तेथे द्यायचें ठरवलें."

"हां. पण तुमची यांची येवढी ओळख होती हें तुमच्या बापाला माहीत होतें की नाही ?"

"माहीत कसें नसेल ? प्रथम तर मी यांच्याशीं बोलत सुद्धा नसें. पण हेच घरीं यावयाचे तेव्हा बाबा, मला यांचा तुझ्यावर फार लोभ आहे, असें सांगत. चहा द्यायला सांगत."

"पुढे—"

"पुढे मला सुद्धा खरोखर त्यांच्याविषयी वाटूं लागलें."

"पण हें बाप जाणत होता ?"

"का नसेल ? बाबा तर कित्येक वेळां मला चिडवीत सुद्धा असत. जा, तुझ्या घरून पैसे आण म्हणून मला त्यांच्याजवळून पैसे आणायला सुद्धा सांगत."

"हं तें कां–?"

बापांचा पगार थोडा आणि आम्ही घरांत भांवडें पुष्कळ. शिवाय आई आत्याबाई. बाबांना नेहमीच पैशाची अडचण म्हणून ते सांगत."

"पण हे गृहस्थ तूं मागितले की पैसे देत ?"

"कां नाही देणार ? त्यांचें माझ्यावर खरें खरें प्रेम होतें."

"बरं. जेव्हा तुम्ही घरून निघालां तेव्हा त्यांनी तुम्हाला कांही लगीन करूं, मी तुला दागिने देईन, वगैरे कबूल केलें ?"

"लग्न करायाचें आम्हां दोघांचें ठरलेंच होतें म्हणून तर घरांतून निघालें."

"त्यांनी दागिन्यांचें कांही नाही तुला सांगितलें ?"

आतापावेतो गरीबपणें खाली मान घालून उत्तरें देणाऱ्या शांतीचा चेहरा वर झाला. कोर्टाचा रोख ओळखून गंभीर मुद्रेने ती बोलूं लागली.

"महाराज, त्यांनी मला दागिन्यांचें आमिष लावून पळवून आणलेली नाही. माझें खरोखर त्यांच्यावर प्रेम आहे म्हणून मी त्यांच्याबरोबर आलें. आम्ही दोघें लग्न करणार आहोंत. आम्ही एकदम तिच्या धिटाईने आश्चर्यचकित झालों. अगदीच साधी पोरगी नाही—आहे तिच्यांत कांही तरी. "पण हा गृहस्थ तुमच्या जातीचा गोताचा नाही, याशीं तुम्ही लग्न करणार !"

"हो—मला करायचें तर ह्यांच्याशीं, नाही तर करायचें नाही."

"तुमचा इतका निश्चय तुमच्या बापाला माहीत होता ?"

" कां नव्हता?" रागावून पण रुद्ध झालेल्या आवाजाने तिनें प्रश्न केला. "बाबांनी मला दुसऱ्या स्थळीं द्यावयाची ठरवली तेव्हा मी बाबांना स्पष्ट स्पष्ट सांगितलें, विनवणी केली, पाय धरले. मला यांच्याशीं लग्न करूं द्यावयाचें नव्हतें, तर मग मला यांच्याशीं इतकी कशाला ओळख वाढवूं दिलीत—आणि आता नाही म्हणतां—?

"पण त्यांचा आपला एकच हट्ट. ते कांही केल्या ऐकेनातच. साहेब, सांगा, अशा वेळीं मला घरून पळून जाण्याखेरीज काय इलाज होता ? तुम्हीच सांगा, ज्याला एकदा कायावाचामनेंकरून वरलें त्याला सोडून दुसऱ्याशीं लग्न करण्यांत पाप नाही कां होत ?"

सात्विक संतापाने अगदी आंतून उसळून येऊन ती बोलत होती. तिच्या त्या आवेशाने विस्मित होऊन आम्ही तिच्याकडे पाहातच राहिलों. तिचा अपराध काय, हें सुद्धा क्षणभर विसरलों. जिवंतपणाचा प्रभावच असा आहे. घाटांतून खळाळत येणारें पाणी पाहिलें की नकळत दृष्टि खिळून राहते. सहज भावनांचा असा जातिवंत उद्रेक दिसून आला की

तो कोठेही असो, मनाला खेचून धरल्याखेरीज राहत नाही.

पण तिच्या शेवटच्या प्रश्नाने मात्र आम्हांला डवचून चांगलेंच जागें केलें. लहानपणापासून पढलेल्या सीता सावित्रीच्या साऱ्या गोष्टी आठवूं लागल्या.

अननुभवी खरी, पण या पोरीला दोषी कसें म्हणावयाचें ? मनांत विचारतरंग उठूं लागले.

"तिचें त्या माणसावर खरें खरें प्रेम आहे." एकजण कुजबुजली.

आणि या तऱ्हेचें प्रेम करावयालाच नाही का आमच्या कथा पुराणें–आमचे आदर्श–शिकवीत ?

"भाबडी पोर !" दुसरी उद्‌गारली.

'वेडे पोरी, तूं म्हणतेस तें अगदी खरें. पण जगाच्या दृष्टीने आज घरांतून पळून जाणें शतपाप आहे.' माझ्या मनांत विचार येऊं लागले.

"तूं म्हणशील 'माझें शुद्ध प्रेम'–पण हें तुझें मन आज कोणाला कळणार आहे आणि त्याची कहाणी कोणाला ऐकत बसायला वेळ आहे? तुझ्या ओळखीच्या किंवा बिनओळखीच्या लोकांत तुझी किंमत काय आहे ? पळून गेलेली–एका दुसऱ्या जातीच्या इसमाबरोबर पळून गेलेली–बदफैली पोरगी. त्या संबंधांत, हें असें कसें झालें याचा विचार करण्याची समाजाला जरुरी वाटत नाही. चूक झाली–चूक आहे की नाही हें सुद्धा पाहत बसण्याची समाजाला परवा नाही. जगाला तुझ्या शुद्ध मनाची परवा नाही, नव्हे असें तुझें मन आहे हें तें ओळखीतच नाही. तें घरांतून पळून गेलेली दुवर्तनी मुलगी म्हणून तुझ्याकडे पाहत आहे आणि तूं जिवंत असेपर्यंत पाहत राहणार.

एका १५ मिनिटांपूर्वी आम्ही सुद्धा तुझ्याकडे तसेंच पाहत नव्हतों काय ? मला आता स्पष्ट दिसतें आहे की तूं दुर्वर्तनी नाहीस–वाईट नाहीसच नाहीस. खरी सद्वर्तनी आहेस. आणि तशी आहेस म्हणूनच

पळून जाण्याचा गुन्हा तूं केलास. पण लोकांना फक्त तेवढेंच दिसतें.—

कोर्टाचें प्रश्न विचारणें चालू होतेंच.

"पुढल्या खेपेला त्यांच्या जन्माचें सर्टीफिकेट सादर करावयाला सांगा, तोंपर्यंत राहतील त्या आश्रमांत—

"राहाल ना शांताबाई? कांही भिऊं नका. तेथे सर्व चांगलें आहे." कठोर म्हणविणाऱ्या कोर्टानें आश्वासन दिलें व केस पुढे ढकलली. शांता परत आपल्या जागीं गेली. नवीन केस सुरू झाली.



आम्ही तेथे बसल्या बसल्या एका मागोमाग एक एक येणाऱ्या अपराधी मुलांचें निरीक्षण करूं लागलों.

हा रतन चोरीच्या आरोपावरून पकडला गेला. याने दुकानांतल्या दोन लेमनच्या बाटल्या लांबवल्या.

हा दशरथ एकाची चड्डी कुडतें घेऊनच पळाला.

रामीने चुलत्याचें पाकीट लांबवलें व ती घरापासून दूर कोठेतरी भटकत असलेली सापडली.

महादू—आतापासूनच मवाली लोकांची संगत धरून त्यांचें अनुकरण करूं लागला होता.

एक ना दोन, अशासारख्या किती तरी गोष्टी पुढे येत होत्या. त्या मुलांच्या गुन्ह्यांबद्दल ऐकूं लागलें की कीव उत्पन्न होई. कोठे चड्डी तर कोठे पाकीट, कोठे सायकल तर कोठे आणखी कांही. काय बिचारी! पण 'काय बिचारी' हें म्हणत असतां त्यांच्या चेहऱ्यावर आपण कांही वाईट केलें आहे असा भंग सुद्धा नाही, हें पाहून मात्र मन जरा भांबावून जाई. कांही नाही, तसलींच पोरें हीं. होऊं द्या थोडीशी शिक्षा, येतील वटणीवर, असेंही मनांत आल्यावाचून राहत नसे.

पण दोन चारदा कोर्टांत गेल्यावर मात्र ही वृत्ति पालटूं लागली. कत्येक वेळां म्हणतात तें खरें आहे. स्वतःला थोडी फार आंच लाग-

झेली असल्याशिवाय, मनुष्याला दुसऱ्याच्या दुःखाची कल्पना येऊन जी खरी सहानुभूति उत्पन्न होते, ती होऊं शकत नाही. आणि एखादे वेळीं झालेली दिसली तरी तिचें स्वरूप इतकें मामुली, इतकें वरवरचें, असतें की त्या सहानुभूतीमुळे हसावें की रडावें तेंच कळत नाही. अशा मामुली सहानुभूतीने 'भाकरी मिळत नाही तर पोळी का खात नाही' असा प्रश्न विचारला जातो. असल्या कोरड्या सहानुभूतीनेच कोर्टासमोर येणाऱ्या एवढ्या एवढ्या कोवळ्या पोरांनी असें आडमार्गास कसें प्रवृत्त व्हावें याचें आश्चर्य वाटतें. प्रतिकूल परिस्थितींतही बेधडकपणें जगण्याचा त्यांचा अट्टाहास बेशरमपणाचा–बेफामपणाचा–वाटतो. पण शांतासारखें स्वतःच्या जवळ असणारें, आपल्याला पूर्णपणें आकलन करतां येण्याजोगें, एखादें उदाहरण पाहिलें की मात्र मन जागें होऊन विचार करूं लागतें.

शांताच्या पळून जाण्यांत चूक घडली हें तर खरें. समजा उद्या त्या माणसाने तिला फसविलें आणि लग्न केलें नाही, असें झालें तर? (अशीं उदाहरणें जगांत कांही अगदी बोटावर मोजण्याजोगीं नाहीत.) पण ही चूक खरोखर वाटते एवढी चूक आहे का? तिने इतकी अखेरची उडी घेण्याइतकीं सबळ कारणें घडलीं नव्हतीं का?

पाण्याचा ओघ सरळ वाहूं दिला तर नीट सरळमार्गाने खाली जातो; पण त्याला चोहोंकडून आडवून पहा. निसर्गनियमांच्या विरुद्ध जाऊन तेंच पाणी शेंकडो फूट उंच उंच धरणांवरून बेफाम उड्या टाकीत वाहूं लागेल. माणसाच्या मनाचें सुद्धा असेंच नाही का? ज्याला आपण गैर–दोषी–असें म्हणतों त्याचा सुद्धा उगम अशाच अडचणीच्या प्रतिकूल परिस्थितींत नसेल कशावरून ?

या कोर्टांत दिवसानुदिवस बसून जीं मी उदाहरणें पाहतें त्यामुळे तर गैर–व दोषी–यांच्याकडे बघण्याचा माझा दृष्टिकोणच पालटतो आहे की काय असें मला वाटूं लागलें आहे.

   

परवा कोर्टासमोर एक दहा बारा वर्षांचा मुलगा खुनाच्या आरोपावरून आला.

वास्तविक आतापर्यंत येणारीं बरीचशीं मुलें चोरी करण्याच्या, पळून जाण्याच्या किंवा मवाली लोकांची संगत धरण्याच्या अशा आरोपावरून तेथे आलेलीं होतीं. इतक्या भयंकर आरोपावरून आलेलें असें हें माझ्या देखत तरी पहिलेंच उदाहरण होतें. पण त्यामुळे असल्या कोर्टांच्या उपयुक्ततेची मला जितकी तेव्हा खात्री पटली तितकी केव्हाच पटली नव्हती. मला वाटतें कित्येक वेळां अशा उदाहरणांनीच आपण जितके खटकन जागे होतों तितके साध्या मामुली गोष्टींनी होऊं शकत नाही. चोरी, चहाडी,मवालीपणा इत्यादि गोष्टी नेंहमीच्या पाहण्यांतल्या व ऐकण्यांतल्या असल्याने विचारशक्तीला तितकें बोंचून जागें करीत नाहीत. पण असें एखादें अतिरिक्त उदाहरण आलें की मात्र तंद्रींत असलेलें मन खाडकन जागें होतें व विचार करूं लागतें.

या एवढ्याशा पोराने एका माणसाचा खून केला ! त्याची केस आल्याबरोबर द्रुत गतीने बातमी पसरूं लागली. कुतूहलयुक्त आश्चर्याने आम्ही अधिक ऐकूं लागलों. त्याच्या केसविषयीं अधिक शोधन करणाऱ्या गृहस्थांनी आपली माहिती दिली. त्याची आई होती, पण बापाचा पत्ता नव्हता. त्याला सगळीं मुलें एकत्र जमलीं की तुझ्या बापाचें नांव काय, बापाचें नांव काय, म्हणन नेहमी भंडावीत. त्या दिवशीं पोरांनी तसेंच भंडावून सोडलें. इतकेंच नव्हे बालवयानुसार अचकटविचकट बोलण्यास प्रारंभ केला. नी थोड्याच वेळांत आतापर्यंत रडत, शिव्या देत, प्रतिकार करीत असलेलें तें कोवळें पोर संचार झाल्यासारखें थरथरूं लागलें. कर्मधर्मसंयोग. त्याला तेथेच एक सुरा पडलेला दिसला. तो घेऊन तो परजूं लागला. एवढ्यांत त्याचा आवेश पाहून एका मोठ्या इसमाने फिरून त्याला बापावरून शिवी हासडून 'रंडकीचा तंर लेक आणि दिमाख किती' इतकें म्हटल्याचें मात्र निमित्त झालें. त्याने सुरा फेकलाच तावडतोब—त्याच्या अंगावर.

भलत्याच नाजूक ठिकाणीं सुरा खुपसला गेल्या कारणाने तो इसम मरण पावला. त्या मुलाच्या हातून खून झाला.

थोडया वेळाने नांवाचा पुकारा होऊन आम्ही समोर पाहिलें तों आमच्यापुढे अगदी फाटक्या अंगाची, लुकडी, अस्थिर वृत्तीची एक लहानशी बटुमूर्ति उभी होती. आपण केवढा भयंकर गुन्हा केला आहे, याची जाणीव सुद्धा त्याला नसावी असें दिसलें. आपल्याला बापावरून असें कां बोलावें, अशा रीतीने स्वतःच्या बावचळलेल्या मनोवृत्तीचेंच त्याचें समर्थन चालू होतें.

कांहीही म्हटलें तरी अखेर, मनुष्य बेफाम झाला, त्याच्या मनाचा तोल सुटला, की अजाणतेपणीं सुद्धा तो काय करावयाला उद्युक्त होतो, याचें एक नमुनेदार उदाहरण येथे आमच्या समोर होतें.

शरीरांत रोगबीज शिरलें की दुखणें येतें.

माणसाच्या मनांत रोगबीज शिरलें की त्याचा तोल जाऊन तें गैर वागूं लागतें.—

पण ही जाणीव आपण कितीशी बाळगतों ?

देवी आल्या, टायफाइड इत्यादि दुखणीं आलीं, म्हणजे कांही आपण त्या माणसाला टाकून देत नाही. त्याच्या दुखण्याचें निदान करून कारण शोधून तें नाहीसें करण्याचा प्रयत्न करतों. पण मनाच्या बाबतींत—? अजून ही उदार दृष्टि यावयाची आहे.

मानवी मनाचे द्रष्टे 'ला मिझराब्ल' सारख्या कादंबऱ्यांतून अट्टाहासाने ओरडून सांगताहेत की शिक्षा हेंच कांही गुन्ह्याला एकमेव दिलेलें उत्तर नव्हे. गुन्हेगारी कमी करावयाची असेल तर माणुसकीने पाहावयाला शिकावयास पाहिजे.

एक वेळ मोठ्या माणसांच्या बाबतींत सोडा, पण लहान लहान मुलांच्या बाबतींत हें किती खरें आहे !

ज्या कोवळ्या वयांत जगांतील अंधाराचें–पापाचें–नांव सुद्धा माहीत नसावें, त्या वयांत हीं मुलें कशीं तेथे येऊन पडतात ? त्यांचा तोल कसा सुटतो ? याचें उत्तर पाहिजे असेल तर वास्तविक चोहोंकडे म्युनिसिपालटीच्या दवाखान्याप्रमाणें मनाचें दुखणें ओळखून तें बरें करण्याचे दवाखाने उघडले पाहिजेत. असल्या रोगांचीं कारणें हटवणारी परिस्थिति निर्माण केली पाहिजे. पण तोंपर्यंत...?

तोंपर्यंत लहान मुलांचीं मनें खरोखर समजून घेऊन एखाद्या बापाप्रमाणें त्यांना वळण लावण्यास उद्युक्त झालेलीं ज्युव्हेनाईल कोर्टें निघालीं तरी पुष्कळ. त्यामुळे निदान आजच्या आजच या कोवळ्या जीवांवर गुन्हेगारीचा–गैरवर्तणुकीचा–शिक्का बसून तीं फुकट तरी जाणार नाहीत.

आक्टोबर १९३१

दृश्य बारावें

# पीर महंमदाचा उद्योग

"तें कांही नाही. गावांत रोग आला की कित्येक वेळां कांही कांही लोकांना तो रोग स्वतःला झाला नसतांही झाल्याची भावना होऊं लागते, तसेंच या बाबतींत आहे." मी आवेशाने उद्‌गारलें.

"पाश्चात्य देशांतलें कांही वाचलें की जणू काय तें सुधारणेचें एक गमकच होऊन बसतें व तें तें सर्व आपल्यांतही आहे, निदान असावें, अशी कांही लोकांची भावना होऊं लागते व ते उगाच नसती हुल्लड उठवतात. मला नाही वाटत आपल्याकडे पोरें पकडून त्यांना गुन्हेगार करण्याचीं–'ऑलिव्हर ट्विस्ट'मध्ये वर्णन केल्यासारखीं–कृत्यें चालत असतील म्हणून. तसले प्रकार तिकडले तिकडे. आपल्याकडे ते आहेत अशी कल्पना करून बाऊ करण्यांत काय हशील आहे ? "

माझा जोरदार हल्ला ऐकून माझ्या बरोबरचे गृहस्थ नुसते हसले मात्र व थोड्या वेळाने मान हलवून हळूच उद्‌गारले,

" तसें होत असेल, नाही असें नाही. पण या बाबतींत मात्र, तसे आपल्याकडे नाही, हें कबूल करण्यास मी मुळीच तयार नाही.

"ऑलिव्हर ट्विस्ट मधील वर्णनांना कदाचित् भडक रंग दिलेला आहे असें तुम्हांला वाटत असेल, पण तो तेवढा सोडला तर असे प्रकार

येथे आहेत–एवढेंच काय, या मुम्बईंत तुमच्या डोळ्यांदेखत चालत आहेत. फक्त त्यांचें तुम्हांला ज्ञान नाही एवढेंच.

"मी उगीच नाही बोलत. आज दहा वर्षें मी सतत काम करतों आहें–आणि माझा सुद्धा विश्वास बसला नसता–पण अनुभवानेच मला या बाबतींत खात्री करून दिलेली आहे.

"कालच आम्ही पीर महंमद नांवाच्या मनुष्याला दोन वर्षांची शिक्षा दिली आणि त्याचा उद्योग काय होता असें तुम्हांला वाटतें? मी सांगून खरें नाही वाटावयाचें; प्रत्यक्षच पाहा."

असें म्हणून त्यांनी पीरमहंमदाची स्वतः तयार केलेली संशोधनपत्रिका माझ्यापुढे टाकली.

एका पाठोपाठ एक एक मी पानें चाळूं लागलें. मी नेहमी पाहत असलेला तोच 'महंमद अल्ली रोड.' त्या रस्त्याने मी हजारों वेळां गेलें आलें असेन, पण तेथल्या चित्रविचित्र मालांनी भरलेल्या मोठ्या दुकानांशिवाय माझी नजर फारशी कोठेच गेली नाही. पण आज हे कागद वाचीत असतां किती निराळ्या रूपाने तोच रस्ता माझ्यापुढे उभा राहत होता. त्याच रस्त्यावरची ही फारशी चटकन् न दिसणारी पोलिस चौकी व त्याच्या जवळची मशीद व विहीर. हे सर्व या आडमार्गांतल्या रहस्यपूर्ण कथानकाचे बालेकिल्ले असतील असें मला कधी वाटलें सुद्धा नसतें. नार्थब्रूक गार्डन्स ! बकाली वस्तींतून जात असतांही गर्दीच्या ठिकाणीं दुर्मिळ असणाऱ्या त्या हिरवळीच्या उघड्या मैदानाकडे मी क्षणभर नजर टाकल्यावाचून राहिलें नसेन. तेथे अष्टौप्रहर बसत असलेले बकाली लोक मी पाहिले आहेत. पण तेथलीं लहान मुलें मी कधी लक्ष्यांत घेतलीं नाहीत. कधी दिसलीं असलीं तरी असतील बिचारीं घरांत जागा नाही म्हणून खेळायला आलेलीं, असें म्हणून त्यांच्याकडे डोळेझाकच केली असेल. पण तीच नार्थब्रूक गार्डन, महालक्ष्मीच्या खालचा पूल, कारनॅक ब्रिजच्या खालील जागा, हीं सर्व ठिकाणें या दृष्टीआडच्या सृष्टींत इतकीं महत्त्वाचीं ठाणीं असतील याची मला बिलकूल कल्पना नव्हती !

तीं पानें वाचतां वाजतां आजवर डोळे उघडून पाहत असूनही न दिसलेली मुंबई मी आज पाहतें की काय असें मला वाटूं लागलें.

या मुंबईचे निर्माते टाटासारखे धनाढ्य कल्पक नव्हते. मोठे मोठे नांवाजलेले शिल्पशास्त्रज्ञ, दानशूर गिरणी मालक किंवा व्यापारी यांपैकी कोणीच नव्हते. तर कित्येक पोरांचे पोशिंदे पीर महंमदासारखे अभिजात कंगाल वीर होते. मला माहीत आहे की इतक्या पोरांचे पोशिंदे म्हणून त्यांना कोणी दुवा देणार नाही, की त्यांच्या कल्पकतेची वाखाणणीही करणार नाही. त्यांच्यांतील एकंदर विधायक कर्तृत्वाची देखील कोणालाच दखल असणार नाही. पण कांहीही असलें तरी हे सगळे गुण मात्र तेथे स्पष्ट दिसून येत होते यांत शंकाच नाही. फक्त फरक एवढाच की, त्यांचा हा पराक्रम उजळ माथ्याने भर प्रकाशांत वावरणाऱ्या लोकांकरितां नव्हता. काळोख्या जगालाच त्याची माहिती होती. पण तीही कांही कमी मनोरंजक नव्हती.

ते कागद वाचल्यावर मला तर पीरमहंमदाला पाहण्याची खरो-खर उत्सुकता उत्पन्न झाली व प्रयत्न करून मी एकदा त्याला मुद्दाम पाहयला सुद्धा गेलें.

खरोखर वरवर पाहणाराला त्याच्यांत विशेष असें कांहीच दिसलें नसतें. एवढेंच नव्हे, तसें जाणवण्याजोगें व्यक्तिवैशिष्ट्य सुद्धा त्याच्यांत नव्हतें. त्याच्या फाटक्या अंगकाठीमुळे आधी तो कोणाच्याच नजरेंत भरत नसे. त्यांतही काळा वर्ण, मळके कपडे व बावळट चेहरेपट्टी यांमुळे तर 'तो एक आहे साधा माणूस' असें म्हणून नजरेंतून पारच सुटत असे. पण एकदा कां तुमच्याशीं बोलूं लागला व बोलतांना कधी त्यानें वर नजर केली, तर मात्र त्याच्या कावेबाज डोळ्यांतील पक्कें पाणी सहज दिसून येई. दोन वर्षे अशाला! दोन वर्षें नाही, आणखी कितीक वर्षें शिक्षा झाली तरी तो काय आपल्या कृत्याचा खरा थांग लागूं देणार आहे काय!

पण ही अशी वरच्या जगाला बावळट भेदरट वाटणारी मूर्तीच या दृष्टीआडच्या सृष्टींतली बुद्धिमान व कल्पक नेती होती यांत संशयच नाही.

वास्तविक त्याच्या जवळ काय होतें? राहायला घर नाही, खायला पोटाचा धंदा नाही. पण इतकें असूनही त्याने आपल्या चलाख मेंदूने आपलें जग निर्माण केलें; स्वतःची तरतूद केली; इतकेंच नव्हे, तर जवळच्या पोलिस चौकीवरच्या पोलिसांच्या डोळयांत धूळ फेकून आणखी किती तरी मुलांचा पोशिंदा बनला. त्यांना त्याने पोटाचा मार्ग दाखवन दिला.–आणि हें सर्व सुद्धा किती शिताफीने? वास्तविक दिव्याखाली अंधार या म्हणीचा फायदा घेऊन त्याने आपलें जाळें आज किती तरी वर्षे प्रत्यक्ष पोलिस चौकीपाशीं विणलें होतें. तेथे बसून तो आपलीं सावजें हेरीत असे. पण कधी तो कुणाला सापडला होता का? मुद्दाम होऊन हे गृहस्थ त्याच्या पाठीस लागलेच नसते तर अजूनही त्याच्या या कारभाराचा सुगावा कोणाला लागला असता काय?

"बाबा पैसा द्याना" म्हणून हात पुढे करून दीनवाणीने पैसा मागणाऱ्या बालकाला पैसा देतांना याचा 'बोलविता धनी वेगळाची' आहे, अशी कधी कोणाच्या मनाला पूर्वी शंका शिवली होती काय? गरीब बिचारें पोर! खायला नाही, काय करणार! मागतें झालें भिक्षा! असेंच तुम्हांला नेहमी वाटत आलें. त्याच्या लोचटपणाचा कितीही राग आला तरी तें सारें नाइलाज म्हणून आहे असें वाटून अखेर दयार्द्र नजरेनेच तुम्ही त्याच्याकडे पाहूं लागतां. पण या तुमच्या दुबळेपणाचा फायदा घेऊन त्यावर कोणी व्यापार करीत असेल असें कधी तुमच्या मनाला स्वप्नांत तरी शिवून गेलें आहे काय? निदान मला तरी असली शंका सुद्धा कधी काळीं आली नाही.

पण ते कागद वाचीत असतां, नुसती शंका नव्हे प्रत्यक्षाचा पुरावा मी पाहत होतें–वाचीत होतें. तुमच्या दयार्द्र बुद्धीचा, लहान लहान कोवळया अर्भकांविषयीं वसत असलेल्या सहज ओलाव्याचा फायदा

घेण्यासाठी जागोजाग विणलेल्या जाळ्यांची मी प्रत्यक्ष माहिती वाचीत होतें.

पीर महंमदाजवळ निदान त्या गृहस्थांना सुगावा लागलेलीं अशीं वीस पंचवीस तरी पोरें होतीं–निदान एवढ्यांची तरी माहिती त्यांना पक्की मिळालेली होती. मग ज्यांची माहिती मिळाली नाही अशीं किती होतीं कोण जाणे !

ह्या सर्वांना तो शहराच्या निरनिराळ्या भागांत अशा शिताफीने पसरून ठेवी की महंमदअल्ली रोडवर एक मशीद व पोलिस चौकी यांच्या मध्ये असलेल्या एका विहिरीजवळ अगदी साळसूदपणें बसणाऱ्या एखाद्या गरीब इसमाचा आणि त्यांचा कांही संबंध आहे अशी शंका सुद्धा येऊं नये.

साऱ्यांनी दिवसभर किंवा रात्रभर–हें वयावर अवलंबून असे–केलेल्या कामाचा गल्ला गोळा करून याच्याजवळ आणून द्यावयाचा, की झालें त्यांचें काम. मग हा त्यांची सोय करतोच आहे. खायला पाव रोटी व चहा, रात्रीं निजायला नार्थब्रूक गार्डन, चौपाटी, फूटपाथ, अथवा पुलाखालची कोणतीही आडसंधीची जागा. आणखी काय पाहिजे ? आणि इतकें मिळत असल्यावर पोलिसांच्या सदैव धाकांत व याच्या करड्या शिस्तींत वाढत असलेलीं मुलें तरी आणखी काय मागणार ? शिवाय तो त्या पोरांना पोटाचा सुलभ मार्ग दाखवीत नव्हता काय ? त्यांत कोठेच आडोसा, काळेंबेरें नव्हतें. निजण्यापासून मालक व मुलें यांचे सारे व्यवहार पूर्ण उघड्यावर होते. पण इतक्यांतही शिस्त आणि स्वतंत्रता यांचें हृदयंगम मिश्रण म्हणतात तें जसें या ठिकाणीं पाहावयास मिळत होतें, तसें इतर कोठे दिसणें शक्य तरी आहे काय ?

काळजी करूं नका; तो फक्त त्यांना कांही भिक्षाच मागावयाला शिकवीत होता अशांतला प्रकार नाही. मुंबईसारख्या गजबजलेल्या शहरांत जितक्या सर्व तऱ्हेनें आपलें ईप्सित साध्य करून घेणें शक्य आहे, तेवढे सारे मार्ग तो आपल्या मुलांना दाखवीत असे. आपल्या धंद्याची

त्याने खरोखर शिक्षणसंस्थाच चालवली होती असें म्हणण्यास हरकत नाही. कान, नाक, डोळे उघडें ठेवून आल्या संधीचा कौशल्यपूर्ण हात-चलाखीने कसा फायदा घ्यावा याचें आपल्या विद्यार्थ्यांना तो संपूर्ण शिक्षण देत होता. नाना सोंगें धारण करणाऱ्या बहुरूप्याप्रमाणें त्याचे विद्यार्थी, वेळीं तुमच्यापुढे अगदी दीन वाणीनें पाझर फुटेल अशा आवाजांत रडून पैसा मागतील, तर कधी तुमचें लक्ष नाही असें पाहून तुमचें पाकीट लांबवितील; वेळेनुसार तुमच्या घराची खिडकी उघडी राहिली असल्यास तुमच्या कांही वस्तूंचा भार कमी करण्यासही त्यांस संकोच वाटणार नाही. पुढे दिसेल ती संधि घेऊन हातीं येणारी वस्तु हातोहात कशी लांबवावी व फिरून आळ घेतलाच तर कपडे झाडून आपला खरेपणा सिद्ध करावयाला तयार अशी सच्ची वृत्ति कशी दाखवावी, अशा प्रकारच्या सर्व कसबांत तो आपल्या मुलांना खरोखरच वाकबगार करीत असे. पण इतकें असून पीर महंमद कधी सापडला जाईल ? नांव कशाला काढतां ?

एक सात आठ वर्षांचें पोर एका घराच्या उघडया खिडकींतून शिरून वस्तु उचलतांना सापडलें, लहानच असल्यामुळे त्याने आपला पोशिंदा म्हणून पीरमहंमदाकडे बोट केलें. पीर महंमद साऱ्या आयुष्यांत पहिल्यांदा कोर्टापुढे खेचला गेला. पण तो त्या पोराच्या सांगण्याला थोडाच भीक घालणार होता ? 'मला हा पोरगा माहीत सुद्धा नाही. रस्त्याने हा वणवण उपाशीं भटकत असतांना मी त्याला पाहिलें. मुसलमानाचा समजून चहापाणी दिलें. जरा जवळ केलें. पण मला काय माहीत, असें मवाली कारटें असेल म्हणून ? त्यावर जरा दया केली तर माझ्याशीं संबंध चिकटवतो आहे. वास्तविक आपण याला ओळखीत सुद्धा नाही.' पीर महंमदाने चक्क सांगितलें.

सापडलें तर मूल सापडेल. त्याच्या वयाकडे पाहून त्याला कोण शिक्षा देणार ? फार तर ठेवतील लहान मुलांच्या तुरुंगशाळेंत ! पण जर चोरी यशस्वी झाली तर—! खास गड्डा मिळेल.

थोडीशी जरब देऊन कोर्टाने पीरमहंमदाला सोडलें. पण फिरून एकदा असेंच गमतीने पीरमहंमदाचें नांव या गृहस्थांच्या नजरे-समोर आलें.

चिचपोकळीजवळून गाडी जाते तेथल्या कबरस्थानाजवळ दोन तीन पोरें सारखीं भिंतीजवळ जाऊन कांही भोकांतून बोटें घालीत व फिरून भांडायला सुरवात करीत.

"तूं माझे पैसे घेतलेस. इथे ठेवले होते मी." असें म्हणून हळूहळू त्यांच्यांत गुद्दागुद्दी सुरू झाली.

कारण काय म्हणून विचारतां असें कळलें की भिक्षा मागून जे काय दिवसाकाठीं पैसे मिळतील त्यांतले एक दोन आणे हळूच या भिंतींतल्या एका भोकांत ठेवायला एका मुलाने सुरवात केली. बरेच दिवस तें सोबत्याच्या ध्यानीं आलें नाही. पण एक दिवस लक्षांत आल्याबरोबर त्याने हळूच भिंतीच्या पोकळपणाची खुबी सम-जावून आपला खाजगी गल्ला करायला किती छान जागा आहे त्याचें महत्व बाकीच्या सर्वांना पटवलें. सगळेजण खुणा करून तेथे पैसे साठवूं लागले. अर्थात् भांडणाच्या दिवशीं एका मुलाचा हिशेब बरोबर लागत नव्हता. तेव्हा त्यामुळे चिडून जाऊन या गुप्त संचयाची बातमी पीरमहंमदाला देण्याची तो सोबत्यांना धमकी घालीत होता. अर्थात् त्यालाही खरोखर पीरमहंमदास सांगण्याची इच्छा नव्हतो, ही गोष्ट निराळी.

त्या भांडणाचें पुढे काय झालें तें फारसें कळलें नाही, पण पीरमहंमद हें नांव मात्र फिरून एकदा त्यांच्या मनांत ठसून गेलें.

कोर्टांत सुद्धा उडाणटप्पू भीक मागणारीं म्हणून पकडून आण-लेल्या वीस पंचवीस पोरांनी निरनिराळ्या वेळीं या एकाच गृहस्थाचें नांव व पत्ता दिला. तेव्हा ही आहे तरी काय भानगड, अशा या नुसत्या संशयावर वरील गृहस्थांनी आपला तपास सुरू केला. तेव्हा कोठें एकेक गोष्टी हळूहळू त्यांच्या नजरेस येऊं लागल्या.

पीरमहंमद असा कांही साधासुधा कार्यकर्ता नव्हता. वरती रायबरेलीपासून खाली मद्रासपर्यंतचीं कितीक ठिकाणचीं मुलें त्याच्या जवळ आलीं होतीं. ही काय नुसती सहजासहजींची गोष्ट होती काय ?

हा पहा उन्हाने काळवंडलेला पण तरतरीत १०–१२ वर्षांचा मुलगा कोर्टापुढे बोलतो आहे.

"काय रे, तुझे आईबाप कोठे असतात ?" कोर्टाने हिंदीत विचारलें. रायबरेलीच्या बाजूस असणाऱ्या एका लहानशा खेड्याचें पोराने नांव सांगितलें. "मग तूं इकडे कसा आलास ?" "असाच एका गृहस्थाबरोबर आलों."

"किस जात का है तू ?" "रजपूत मुसलमीन हूं." मुलानें अभिमानाने उत्तर दिलें. 'रजपूत मुसलमान !'–तें पहा त्याच्या हातावर 'लछमन' हें हिंदू नांव गोंदलेलें आहे–एका प्रोबेशन आफिसराने मध्येच उठून कोर्टाच्या नजरेस आणलें.

"तेरे हाथपर तो हिंदु नाम है."

"हां साब; पहिले तो हिंदू था. पर अब मुसलमीन हूं."

"कैसे हुआ मुसलमीन ?"

"घर से भाग आनेपर मै महंमद के पासही था ! उसने मुझे खाना दिया, कपडा दिया. एक दिन महंमदने मुझे कहा कि 'तू मुसलमान है' और कहा कि किसीने पूछा तो 'मुसलमान' करके कहना !"

"तेरे को काझी के सामने खडा किया था ?" कोर्टाने विचारलें.

"नही साब. मुझे तो मालूम नही !"

"फिर तुम मुसलमीन कैसे हो, देखो छोकरा, तुम मुसलमान नहीं ! तुम्हारे हाथ पर हिंदु नाम है ! तुम हिंदु हो ! अब तुझे कोई पूछे तो 'हिंदु हूं' करके कहना !"

"जी साब" मुलाने साहेबांच्या खेळकर सहानुभूतिपर मुद्रेकडे पाहून हसून कबूली दिली.

पुढे त्याच्यावरील उचलेगिरीच्या आरोपाचा खटला सुरू झाला.

हें एकच उदाहरण नव्हे; रायबरेली पासून तो खाली मद्रास पर्यंत निरनिराळ्या भागांतील मुलें अशीं अचूकपणें या महंमदाच्या भोवती गोळा झालीं असून जात, गोत, धर्म विसरून त्यांचीं कधीच ओळख न पटतां कालक्रमणा करीत आहेत. अशा स्थितींत पीर महंमच्या कार्यक्षमतेची कोणाला शंका येईल !

१९३६.

# टेम्स नदीवरील एक आठवण

'आर्मिस्टिस डे'चा दिवस ! व्हाईट हाल समोरील सिनेटाफ-जवळ प्रचंड गर्दी जमली होती. सागराला भरती आली म्हणजे भोवतालच्या खाड्यांनाही पाणी चढावें, त्याप्रमाणें, पिकॅडिली, ट्राफलगार स्क्वेअर, एम्बॅंकमेण्ट इत्यादि चौकांतही व्हाईटहालकडून येणाऱ्या रस्त्यांमध्ये माणसांची रहदारी सारखी वाढत होती. बसेस तर नाक्यापासून कुठल्याकुठे थांबून, लांबचे वळसे घेऊन जात होत्या. व्हाईटहॉलच्या त्या चौकांतील साऱ्या इमारतींच्या खिडक्या व गॅलेऱ्या प्रेक्षकांनी नुसत्या फुलून निघाल्या होत्या. कधीही पादपथ न सोडतां चालणारे लंडनचे लोक आज व्हाईटहालच्या प्रशस्त पादपथावरून खाली उतरून, कितीक फूट तरी रस्त्यांत येऊन उभे राहिले होते. लहानथोर, गरीबश्रीमंत, स्त्रीपुरुष सारे एकमेकांच्या खांद्याला खांदे घासून चिकार दाटीने उभे असून कशीबशी पायाखालची जागा सांभाळून तोल सावरीत होते. कारण पाण्याच्या लोंढ्याप्रमाणें जिकडून माणसांचा लोंढा येई, तिकडून दर क्षणाला चेपाचेपी सुरू होई आणि कांही पावलें मागे व कांही पावलें पुढे, अशा रीतीनें सारा जनसंमर्द झुलूं लागला की. तोल संभाळण्याची सुद्धा मुष्कील पडे. त्यांना थोपवून

धरतां धरतां लंडनचे सहा फूट उंचीचे पोलिस सुद्धा श्वास थकून गेले असले पाहिजेत. पण इतकें असूनही, त्यांनी आपली साखळी कायम ठेवली व मधला रस्ता अगदी निर्मनुष्य राखला. त्या रस्त्यावर फिरकण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती. काय मधून मधून एखादा लष्करी घोडेस्वार आपला लालसर भपकेबाज युनिफार्म घालून हिंडेल तेवढाच.

साडे दहा झाले. त्या अभ्राच्छादित दिनप्रकाशांतही चमकणारीं शिरस्त्राणें दिसूं लागलीं, संगिनी चमकूं लागल्या, लाल पिवळ्या फितींनी शोभणारे शिपाई दिसूं लागले. फुरफुरत मान आखडून चालणाऱ्या घोड्यांवरचे घोडेस्वारही आले व सर्वांचें लक्ष सिनेटाफकडे लागलें. सिनेटाफवर सोनेरी दांडीचीं निळीं, तांबडीं, पांढरीं अशीं निशाणें मस्तक अवनत करून फडकत होतीं. वरती युनियन जॅकचें भव्य निशाण अर्धवट सुटलेलें होतें, खाली तांबड्या पांढऱ्या पिवळ्या फुलांनी व पानांनी शोभणारीं गेंददार कुसुमवलयें एकावर एक चढलीं असून खालचा चबुत्रा केवळ फुलांचाच बनविला आहे की काय, असें नवशिक्या पाहणाराला वाटत होतें. इतक्यांत बादशहांची स्वारी आली. उरल्या सुरल्या सगळ्यांच्या टोप्या भराभर खाली गेल्या व व्हाईटहालकडे तोंड करून मांडलेल्या सिनेटाफजवळच्या व्यासपीठाकडे लोकांचें लक्ष केंद्रित झालें. बंदुकातोफांची सलामी झाली. बादशहा, अमीर-उमराव, मुत्सद्दी, राजेमहाराजे, धर्मोपदेशक सारे उठून उभे राहिले. त्यांच्या समवेत एवढा अफाट पसरलेला जनसंमर्द एकस्वराने प्रार्थनागीत गाऊं लागला.

एक कडवें संपलें ! दुसरें संपलें ! तिसरें संपलें. अकराला तीन मिनिटें राहिलीं. सबंध तो चौक एकदम झोपीं गेल्यासारखा तटस्थ होऊन खाली मान घालून उभा राहिला. काय ऐकूं येईल, तो जवळच्या माणसाचा श्वासोच्छ्वास; यापलीकडे कांही नाही. इतकी एका क्षणार्धांत तेथे गाढ शांतता पसरली. अरेबियन नाईट्समधील झोपीं गेलेल्या नगराप्रमाणें, त्या शून्य व निस्तब्ध वातावरणांत 'बिग बेन' चा

आवाज घुमूं लागला. बादशहा, प्रधानमंडळ, राजेरजवाडे, अमीर-उमराव, धर्मोपदेशक, जनता, साऱ्यांनी प्रार्थना करून मृत वीरांचा गौरव केला. कांही बाया बापड्यांच्या, वृद्ध माणसांच्या डोळ्यांतून घळ-घळां अश्रू ओघळूं लागले. तरुण मनेंही भरून आलीं.

एक! दोन! तीन! बरोबर अकरा ठोके! फिरून सारी जनता जागी होऊन लंडनची नेहमीची गडबड धामधूम सुरू झाली. लोक आपआपल्या ठिकाणीं जाऊं लागले. मीही एम्बँकमेंटवरून कॉलेज-कडे चाललें.

त्या देखाव्याने मीही इतकी भारून गेलें होतें की, झोपेंत चाल-णाऱ्या मनुष्याप्रमाणे मी पुन्हा तोच चित्रपट पाहत पावलें टाकीत होतें. आणि खास त्याचे शब्द ऐकूं आले नसते तर त्याचीं तीं निर-निराळ्या रंगांनी रेखाटलेलीं पादपथावरील चित्रें पावलांनी पुसकटून मी तशीच पुढे गेलें असतें.

"Please, Miss, Won't you step aside?" ("बाई, मेहेरबानी करून आपण बाजूस सरकणार नाही काय ?") जरा रागीट स्वरांत उच्चारलेले शब्द मला ऐकूं आले आणि मी दचकून त्याच्याकडे पाहिलें. पाहण्याजोगें, असें त्याच्यांत कांहीच नव्हतें. एक पाय तुटल्यामुळे फरफटणारा, ओव्हर कोटाच्या लकतऱ्या झाल्याने कुडकुडणारा, पंजाबांतील दुआबांप्रमाणें हातावरच्या काळ्या निळ्या शिरांचा संगम वाहिन्या-उपवाहिन्यां-सहित लाल हातावर उठून दिसतो आहे, असा तो भिकारी आपल्या चित्राखालचीं शेवटचीं अक्षरें लिहीत होता. त्याची टोपी तेथेच चित्रांजवळच पडलेली दिसत होती.

"Sorry" ("दिलगीर आहें.") म्हणून मी त्याच्याकडे पाहिलें.

"Excuse me Miss, I did not know." ("माफ करा, बाई, मला माहीत नव्हतें.")

मी परदेशी म्हणून माफी मागण्याच्या स्वरांत त्याने वरील वाक्य उच्चारलें आणि का कोण जाणें, त्याच्या त्या दिलगिरीच्या स्वरांत मला किंचित् नकळत आलेल्या सहानुभूतीचा भास झाला. जणू काय मी हिंदी म्हणूनच तो असें म्हणाला. मी त्याच्या चित्रांकडे पाहूं लागलें. एका वर्तुळांतील, तरुण, दमदार, पदकें चढवलेल्या शिपायाच्या टोपींतील चांदाकडे माझें लक्ष वेधलें.

त्याच्याखाली एकच वाक्य लिहिलें होतें. " १९१८ सालीं हीच टोपी वीरचिन्हांनीं विभूषित झाली होती आणि १९३२सालीं—" असें म्हणून दुसऱ्या वर्तुळांत त्याने पादपथावर प्रत्यहीं दिसत असलेल्या एका भिकाऱ्याच्या टोपीचें चित्र काढलें होतें.

डिसेंबर १९३४

चवदावें

# विलायतचें पत्र

चि. शशीस सप्रेम आशीर्वाद—

आज आता या वेळीं माझ्या लहानशा खोलींत मी अगदी एकटी बसलें आहें. ही खोली इतकी बाजूला आहे की, कसली गडबड मला एवढी सुद्धा ऐकूं येत नाही. बाहेर थंडीच नाही नुसती, तर धुकें व ढग यांनी संगनमत केल्यामुळे आता भर दुपारीं १२ वाजतां संध्याकाळ झाल्यासारखा अंधार पडला आहे. जरा धक्का लागला की एकदम सर्व आंग आंत ओढून घेणाऱ्या सुरवंटाप्रमाणे नुसता बाहेर जायचा विचार डोक्यांत आला की, माझे मन येथे पेटलेल्या शेकोटीला चिकटूं पाहत आहे. शेगडींतील कोळसे रसरसून पेटले असून, त्यांच्यांतून निघणाऱ्या सुवर्णरंगी, हसतमुखाने वर वर चढणाऱ्या ज्वालांकडे पाहत बसलें की, मला ही शेकोटी म्हणजे मनुष्याला अन्तर्मुख बनविणाऱ्या, मायेची ऊब व प्रेमळ सान्निध्याचा आनंद हीं सर्व एकवटून, बाहेरच्या जगाचा विसर पाडणाऱ्या गृहसौख्याचें प्रतीकच असें वाटूं लागतें. म्हणूनच त्या शेकोटीच्या उबेंत बसून, तिच्याच प्रकाशाने प्रकाशित होऊन, मी माझें घराचें चित्र रंगवीत आहें. दत्ताने गुरु केले तेव्हा सगळ्या वस्तुमात्रांतला चांगला गुण घेतला. मी पण तसेंच करणार

आहें. आपल्यांतील चांगलें मला दिसत नाही असें नाही. तसेंच येथलींही कुटुंबें पाहून एखादे वेळीं मनाला धक्का बसत नाही असेंही पण नाही. पण सगळ्यांतले चांगले रंग उचलून त्यांच्या छटा बेमालूम मिसळवितां नाही का येणार ?

हो, या पाश्चात्त्य नवकल्पनांच्या क्षेत्रभूमीवर पाऊल टाकून सुद्धा माझ्या मनांत अजून क्रांति झालेली नाही; 'घराविषयीं' तिटकारा उत्पन्न झालेला नाही. मला घर पाहिजे आहे. एवढेंच नव्हे तर मनुष्याच्या समजुतीचा विकास या घराच्या संशोधक भूमींत(Nursery) जसा होऊं शकतो तसा इतरत्र होईल की नाही याची मला शंका वाटते. छे, माझें मन अजून 'घरा'च्या कल्पनेला चांगलेंच बिलगूं पाहतें. मुलांची जोपासना राष्ट्रीय शाळेंत करून स्त्रीपुरुषांना सुविद्य करूं पाहणाऱ्या संन्याशाच्या संसाराची गोडी मला अजून कळत नाही. महत्वाची भावना ही सर्व जागतिक आपत्तीचें मूळ कारण म्हणून त्यावर गदा घालूं पाहणारे कुटुंबसंस्थेला चिरडूं पाहतात. पण जोंपर्यंत आई व मूल हा चमत्कार जगांत आहे तोंपर्यंत कुटुंबसंस्था नाहीशी होणें कठीण आहे. नव्हे, तें निसर्गाविरुद्धच आहे असें मला वाटूं लागतें.

काल अशीच मी एका घरीं बसलें होतें. तेथे मला अगदी घरासारखें वाटत होतें. अजूनही आठवण झाली की वाटतें हिंदुस्थानांत अशीं घरें कां दिसत नाहीत ? मी माझ्या मैत्रिणीकडे होतें. नाताळचे दिवस असल्याने तिच्या घरची सारी मंडळी एकत्र जमली होती. गेले कांही दिवस तर आमचे इतके मजेंत गेले की खरोखर परक्या प्रदेशांत मी राहतें आहें हें कांहीसें विसरलेंच होतें. तें घर म्हणजे गृहसौख्याचें एक अप्रतिम चित्रच असें मला वाटलें. मुली, सुना, भावी सुना, मुलगे, सारी मंडळी एकत्र जमली होती. पण एवढी धुसफुस नाही, कुरकुर नाही की कांही नाही. नव्हे, मला जर माहीत नसतें तर या सुनाच म्हणून सुद्धा ओळखणें मला

हिंदुस्थानांत पाहिलेल्या उदाहरणांवरून जड गेलें असतें. तेथे आपल्या मनाला चमत्कारिक वाटणाऱ्या किती तरी गोष्टी होत्या. एवढें चांगलें प्रोफेसरांचें कुटुंब, पण मिळवत्या मुलीचे खानावळीप्रमाणें घरांत पैसे घेत असत. मिळवूं लागलेल्या साऱ्या मुलांचा कारभार स्वतंत्र. ज्याचें त्याचें स्वतंत्र घर. सर्व स्वतंत्र ! छे अजूनही आपल्याला ही कल्पना कशी तरी वाटते नाही ? पण इतकें असून सुद्धा आपल्याकडे न आढळणारें असें कांही तरी त्या घरांत होतें. आणि खरोखर त्यानेच माझें मन वेधलें म्हणेनास !

तुला वाटेल मी इकडे येऊन बदललें. पाश्चात्य तेवढें सारें चांगलें व आपलें तें सारें वाईट अशी साहेबी माझी दृष्टि झाली. खरोखरच अशांतला प्रकार माझ्या वाटण्यांत आहे असें मला मुळीच वाटत नाही. 'मनुष्यस्वभाव सगळीकडे सारखा आहे' 'भांड्याला भांडें जवळ असतांना लागलेंच पाहिजे' इत्यादि व्यवहारशास्त्रांतील नियम त्रिकालाबाधित आहेत, हें मी अगदी ताबडतोब कबूल करतें. पण जें आपल्यांत सापडत नाही, त्याचा इतका मनोहर संगम इतरत्र दृष्टीस पडला तर तो केवळ परकी म्हणून त्याकडे पाहून नाक मुरडण्याइतकी मी अरसिक नाही. इतकी एकांगी देशभक्ति पण माझ्यांत बाणलेली नाही.

मी कांही थोडे थोडके दिवस त्यांच्या घरीं नव्हतें. पण तेवढ्यांत मला असें वाटूं लागलें की खरोखर हिन्दुस्थानांत अशीं घरें होतील त्या दिवशीं आमची गुलामगिरी संपलीच म्हणून समजा. गुलामगिरीच्या मनोवृत्तीचें बाळकडू केवळ राजकीय गुलामगिरीनेच आम्हांला मिळतें असें नाही. जन्मापासून जातीने, घरांतून चोहोंकडे तें रक्तांत भिनलें जातें. त्यानंतर तो आमचा जन्मजात स्वभावच बनून गेला तर मोठें नवल तें काय ?

कुटुंबांतील माणसें म्हणजे कित्येक वेळां मला हिंदुस्थानच्या शेजारीं असणाऱ्या लखदीव मालदीव बेटाच्या समुद्राप्रमाणें दिसूं लागतात. नांव एक खरें, पण प्रत्येक लहानसें बेट स्वतःभोवती समुद्राचा कोट करून

इतरांपासून अलग असतें. कुटुम्बांतील व्यक्ति सुद्धा कितीतरी घरांतून स्वत: भोवती असें मानसिक कडें घालून वावरतांना आढळतात. एका घरांत असतांना प्रत्येकाची वाढ इतकी अलग व पृथक्‌पणें होत असते की, खरोखर त्यांच्या एकत्र राहण्यापलीकडे एकमेकांच्या मनांचा एकमेकांना पत्ता आहे की नाही याचीच मला शंका येते. ही स्थिति इकडेही असेल, नाही असें मी म्हणत नाही. पण प्रत्येकाच्या व्यक्तित्वाला मान मिळत असल्याकारणाने त्यांच्या कुटुम्बांत जितका मोकळेपणा आढळतो तितका आपल्या कुटुम्बांत आढळत नाही. आपल्याकडे जर अशीं सासू–सासरा, नणंदा–जावा, दीर–भावजया या नात्याची मंडळी एकत्र जमली असती तर क्षणोक्षणाला कुणाचें कोण लागतें याचा कधी विसर पडलाच नसता. सासूबाईंना विचारल्याशिवाय सुनेच्या घरीं सुद्धा सून निराळी स्वत:च्या मताने वागूं शकली नसती. मग सासूसासरा व सून यांच्यांत इतका मोकळेपणा कुठला आढळायला ?

मला एका वेळचें संभाषण तर चांगलेंच आठवतें आहे.

"काय हें ! सगळी आरास अखेर अगदी ठराविक साच्याची ! कांही वेगळें म्हणून तुम्हांला बायकांना करायला नकोच. बायकी बुद्धीला तें कुठलें जमायला म्हणा, नाही तर माझ्याकडे पहा. मी बघ कसा ह्या स्कॉच (लोकांच्या) हुक्क्याची नळी तोंडांत धरून आज मोंगल बादशहा बनलों आहें तो."

"हो तर, म्हणूनच मी नेहमीची आरास केली नाही, नाही तर लोकांचें लक्ष माझ्या आराशीकडे वेधल्यावर तुमचा हा मोंगल बादशहाचा थाट फुकटच जावयाचा."

"मायकेलची आजी, हें पाहिलें का बाबांचें रूप ? ते मोंगल बादशहा बनले आहेत, आता तुम्हांला पट्टराणी म्हणूनच सजून यावें लागेल. बाकी मोंगल बादशहांच्या राण्या बाहेर येत नसतात हो. तुम्ही आपल्या तिकडे पडद्यांतच."

"Hallo Darling ! तुझ्या वडलांकडे पाहिलेंस. बादशहाची स्वारी आहे आपल्या घरीं." म्हणून झटकन् पाश्चात्य पद्धतीने कुर्निसात करून आपल्या नवऱ्याच्या खांद्यावर हात टाकून ती उभी राहिली. हा वरचा संवाद सुरू झाला सून सासऱ्यांत व पुढचें सारें बोलणें सुनेचें आणि ती सुद्धा एखादी लहान पोरबीर नसून, चांगली एका पोराची आई आहे. पण तिचा कुर्निसात व हास्यविनोद इतका सरळ होता की खरोखर मजा वाटल्यावाचून राहीना. पण सवय नसल्यामुळे माझें हिंदी मन एक क्षण जरा चमकूनच गेलें. मी कांही तिचें नवऱ्याच्या खांद्यावर हात टाकण्याबद्दल किंवा Hallo Darling म्हणण्याबद्दल कौतुक करीत नाही. मुलखा मुलखाच्या चालीरीती निराळ्या, वागण्याची पद्धत निराळी आणि तशीच तेथलीं माणसें वागतात. पण या भिन्नतेंतून प्रतीत होणारी मनोवृत्ति बरेच वेळां एकच असते. एखादी आंग्ल युवती पतीला लाडाने हाक मारून, दारांत दिसल्याबरोबर त्याच्या गळ्यास जाऊन मिठी मारील, तर एखादी हिंदी 'आर्य' स्त्री मधल्या घरांतून हळूच डोकावून पाहून नजरभेट झाल्याबरोबर दृष्टि जमिनीकडे वळवील. पण दोहोंतून व्यक्त होणारी प्रेमाची भावना कांही निराळी होत नाही. म्हणनच मला प्रश्न पडतो की, हाच मोकळेपणा आपल्याकडे सासूसासरा व सून या संबंधांत सापडतो का ? लग्न झाल्यानंतर मुलीच्या मनांत पहिली कल्पना कोणती येत असेल तर, सासरीं जावयाचें ही. पण सासर म्हणजे कांही सदैव स्वतःचेंच घर असें नव्हे. ही सासरची कल्पना काढून घराची कल्पना नाही का त्या ठिकाणीं वाढवितां येणार ? नांवाच्या संबंधाने आलेली आखाडांतील सासूसुद्धा सासूपणा गाजवायला सोडीत नाही. मग खऱ्याखुऱ्या सासवेच्या हाताखाली किती प्रेमळपणाने वागवलें तरी स्वतःच्या घराची भावना कशी येणार ? आमची सासू, सासरा, सून इत्यादि नात्यांचा कारभार अगदी उत्तमांतला उत्तम घेतला तरी त्याचें स्वरूप पितृवात्सल्याने राज्य चालविणाऱ्या संस्थानाप्रमाणें असतें. तेथे

चांगुलपणा असतो, चांगुलपणाच्या पोटीं उत्पन्न होणारा मोकळेपणा येऊं लागतो, पण स्वतंत्रता व त्यामुळे येणारा मोकळेपणा दिसून येत नाही. आता हें मोकळेपणाचें पुराण सुरू झालें असें तूं खास मनांत म्हणत सुटशील.

बाकी मला सर्वांत पसंत पडली असेल तर पुरुषांनी घरांत मदत करण्याची पद्धत. जेवण संपलें, चहा झाला, की लागलीं सर्वजण चटकन आवरायला. मग तेथे "तूं मुलगा आहेस ना, तूं नाही पाना-जवळचें भांडें उचलायचें," असली शिकवण वगैरे कांही नाही. तर सगळीं कामाला. कुणी टेबलावरच्या बशा उचलील तर कुणी ग्लासें गोळा करील. एखादा सगळे रुमाल गोळा करून टेबलाच्या खणांत ठेवील. चहाच्या वेळीं तर किती तरी वेळा भाऊभाऊच सारी तयारी करून चहा तयार झाला की आम्हांला बोलावीत. तो सगळा देखावा पाहत असतां माझ्या डोक्यांत एखादे वेळीं येई, असें हिंदुस्थानांत पुरुषांनी केलें तर? छे, तें पुरुषांनाही आवडावयाचें नाही, की बायकांनाही बरें वाटायचें नाही. मुंबईच्या चाळींतील जीवनक्रमांत तर असे नमुने फार दिसतात. इकडे बायकोला घेऊन बाहेर फिरावयला जावयाची किंवा नाटकाला जावयाची पतिराजांना हुक्की आलेली असतां पत्नीला उष्टीं खरकटीं सासूबाईंच्यावर टाकून जायला कसेंसेंच वाटतें. पतिराजांचा जीव उशीर होत असल्यामुळे अगदी खाली वर होत असतो. पण अशा धांदलींत बायको असतांना पाट उभा करतील? छे मग झालंच. 'हीच सुधारणा बरें. सुधारणा करतांना अशाच बायका डोक्यावर बसतात.' इत्यादि गोष्टी नुसत्या शेजाऱ्यापाजाऱ्यांतच होऊन नाही भागायच्या, तर गणेशोत्सवांत खड्या सुराने सुधारणेच्या पोवाड्यांची टाळ्यांच्या गजरांत खुसखुशीत मजलस होईल, तेव्हा कुठे सारं थांबेल—

असो. पण खरं सांगूं का? माझें मन सगळ्याहून जास्त कशाने ओढलें असेल तर माझ्या मैत्रिणीच्या आईने वडलांना दिलेला आरसा पाहून. त्या आरशाची निवड आरसा म्हणून झाली नव्हती. त्याच्या पाठीमागे असलेल्या कवितेने त्याला महत्त्व चढलें होतें.

" वय वाढत आहे. आपलें तारुण्य नष्ट होत चाललें आहे. म्हातारपणींची ध्वजा केसांवर केव्हाच फडकलेली आहे. चेहऱ्यावर तरुणपणची ज्वानीची कळा जाऊन जागोजाग सुरकुत्या पडूं लागल्या आहेत. एके वेळीं हाताखांद्यावर चढलेलीं, आपल्याशिवाय एक घटका-भरही चैन न पडणारीं मुलें बाळें आता मोठीं होऊन स्वतःचा संसार करूं लागलीं आहेत. त्याच्यांत तीं गुंग असतात, आपली जरूरी त्यांना इतकी भासणार नाही ! एवढेंच नव्हे, जगांतले बाहेरचे व्यवहार संपले की, भोवतालचें जगसुद्धा आपल्याला विसरूं लागेल. पण जोंपर्यंत तूं आणि मी एकमेकाच्या शेजारीं हाताला हात धरून उभीं आहोंत तोंपर्यंत यांतल्या सगळ्या गोष्टींचें मला कांही सुद्धा वाटणार नाही." या अर्थाची आरशाच्या मागली कविता वाचून माझें मन एकदम भरून आल्यासारखें झालें. आज त्या दोघांचें वय पाउण-शेच्या घरांत आहे. त्या कवितेंत वर्णन केल्याप्रमाणें खरोखरीच त्यांची स्थिति आहे. पण जीविताच्या या संध्याकाळीं सुद्धा मावळत्या सूर्याचीं सोनेरी किरणें आकाशांत फेकलीं गेल्यामुळे काळे ढग सुद्धा उजाळून जाऊन आकाशांत सुवर्णसमुद्र फेसाळल्याचीच शोभा यावी तशी शोभा ह्या दोघांच्या जीवनावर पसरलेली आहे. आमचा संसार झाला, सुखाने झाला, असें म्हणण्याचा अधिकार दोघांनाही प्राप्त झाला आहे.

सगळ्यांच्याच आयुष्याच्या शेवटीं सांज इतकी फुलून येत असेल का ?

मला पक्की जाणीव आहे की, हीं चित्रें जागोजाग दृष्टीस पडत नाहीत. पण एका इंग्रजी घराचें नजरेस पडलेलें हें गोड चित्र पाहून, माझें मन खरोखरच मोहून गेलें. या घराच्या घरपणांत प्रेमळपणा, स्वतंत्रता, व्यक्तित्व यांचा हृदयंगम संगम मला दृष्टीस पडला. अशीं चित्रें जर घरोघर दिसतील तर लोक स्वर्गसुखाला लाथाडून, पृथ्वीवर वारंवार जन्माला येऊं पाहतील.

जानेवारी १९३४

# मॅन्चेस्टर व आसपास १

मी उन्हाळ्याच्या सुट्टीचा एक महिना मॅनचेस्टरमध्ये काढणार हें ऐकून माझी हिंदी मित्रमंडळी अगदी हसूं लागली. त्यांच्या मतें वास्तविक या सुट्टींत युरोपखंडावर भटकायला जावयाचें. तें नाही तर निदान ब्राईटन तरी! बरें, मला अगदी वरच जावयाचें असेल तर स्कॉटलंड, लेक डिस्ट्रिक्ट. पण मॅन्चेस्टर कुठलें काढलें बोवा! त्यांना कल्पनाच करवेना. मी मात्र निघालेंच होतें. कारण एक तर मला माझें 'प्रॅक्टिकल' तेथे करावयाचें होतें व इतरही कितीतरी गोष्टी तेथे पाहावयाच्या होत्या. शिवाय माझ्या ह्या मित्रमंडळीइतकी ती कल्पना मला हास्यास्पद वाटत नव्हती. ब्रिटिश राष्ट्राचें सारें डोकें लंडनमध्ये असेल, पण ब्रिटनचा आत्मा मॅन्चेस्टर व त्याच्या आसपास असलेल्या भागांतच धडधडत आहे. तेथल्या कोणत्याही व्यापाराला जरा पायबंद बसूं द्या, लंडन दवचल्यासारखें जागें होतें व विचार करूं लागतें. सारें ब्रिटिश राष्ट्र हादरल्यासारखें होऊन पाहूं लागतें. अशा महत्त्वाच्या भागांत मी जाणार, या एका कल्पनेनेच मी किती तरी भारून गेलें होतें. वास्तविक हिंदी मुलांना गिरण्यांच्या, कारखान्यांच्या आंत प्रवेश सुद्धा करूं देत नाहीत आणि ती संधि मला मिळणार, यामुळे

तर माझी उत्सुकता अधिकच वाढली.

संध्याकाळच्या सुमारास मी मॅन्चेस्टरला उतरलें. उतरतांच, प्रथमदर्शनीं तरी माझा हिरमोड झाल्याशिवाय राहिला नाही. इंग्लंडचें पहिल्या प्रतीचें औद्योगिक शहर किती सुंदर असेल अशी माझी कल्पना होती ! आणि येथे तर माझ्या दृष्टीसमोर दिसत असलेलें शहर अगदी धुराने काळवंडलेलें व नुकताच पाऊस पडून गेल्यानें खरोखर अस्वच्छच दिसत होतें. काय घाणेरडें शहर हें ! इतका पैसा व इतकीं यांत्रिक साधनें सज्ज असतां सबंध शहराचें Spring Cleaning (वासंतिक शोधन) कां नाही हे लोक करीत ! खरोखर या शहराला पहिल्यांदा कांही पाहिजे असेल तर एक मोठा ब्रश व साबू पाणी घेऊन धुवायला पाहिजे आहे, त्याशिवाय हा धुरकटलेला काळे-पणा नाही जावयाचा.

एक दिवस दुकानें पाहत मी अशीच हिंडत होतें. चांगलें ऊन पडलें असल्याकारणाने कोट वगैरे कांही न घालतां इकडल्याप्रमाणेंच पायांत वहाणा घालून मी हिंडत होतें. माझें सर्व लक्ष दुकानांकडे होतें. पण थोडचा वेळाने हळूच मला मागे पाहण्याची इच्छा झाली. आणि रस्त्याने जाणाऱ्या येणाऱ्या बऱ्याच लोकांचें मी नयनकुतूहल होऊन बसलें आहें असें माझ्या लक्षांत आलें. त्यांत मुलें, थोर, सारीं होतीं. कोणी माझ्या साडीकडे बोट दाखवीत होते, तर कोणी पायां-तल्या चपलांकडे सोबत्याचें लक्ष वेधण्याचा प्रयत्न करीत होते. मी तोंड फिरवलेलें पाहतांच मात्र मोठी मंडळी लहानांना जरा दटावून चालूं लागली. तरी पण त्यांची जिज्ञासा पुरी झाली नसल्यामुळे एखाद्या 'पाईड पायपर' प्रमाणें मी पुढे चाललें असतां मुलांचा तांडाच्या तांडा माझ्या मागे किती तरी वेळ येत होता. बस पकडून मी लवकरच तेथून पळ काढला म्हणून ठीक, नाहीतर ती जिज्ञासा कोठवर पोचली असती याचा नेम नव्हता. पण याहीपेक्षा खरा व चमत्कारिक अनु-भव आम्हांला दुसऱ्याच दिवशीं मी पार्कमध्ये हिंडतां हिंडतां अखेर

एके ठिकाणीं वाचीत बसलें तेव्हा आला. माझें लक्ष नव्हतें, पण मी मुलांच्या विभागाजवळून गेलें असतां कांही मुलांनी मला पाहिलें व त्यांतलेंच एक ६–७ जणांचें टोळकें माझ्या मागोमाग मी बसलें होतें तेथे त्या झाडाजवळ येऊन उभें राहिलें. वाचतां वाचतां त्यांचा संवाद मला ऐकूं येऊं लागला.

"खास ती एक 'ब्लॅकी' आहे." एक उद्गारला.

"चल हट, ब्लॅकी नाही. ती इंडियन आहे. मला माहीत आहे. माझ्या बापाजवळ इंडियाचीं चित्रें आहेत. तेथल्या बायका असाच पोषाक करतात." दुसऱ्याने अधिकारवाणीने माहिती दिली.

"ओ ! तिच्या कपाळांतून बघ काय आलें आहे. तें बघ लाललाल रक्तासारखें."

"ती त्यांच्या धर्माची खूण आहे." एका मोठ्या मुलीने उत्तर दिलें.

"किती गंमतीचा पोषाक, नाही ?"

"ती कायरे, तशीच सगळी काळी असेल काय ?" एकाने प्रश्न केला.

"तिची काळी कातडी भाजल्यासारखी लागत असेल नाही ?"

"कशी हाताला लागते कोण जाणे ?" एक मुलगी उद्गारली. मला मात्र आपल्याकडे एका युरोपिअन बाईला मी एका खेड्यांत घेऊन गेलें होतें तेव्हाचा प्रसंग आठवला. तिची कातडी कशी लागते हें पाहण्याकरतां आमच्याकडच्या एका पोरीने तिच्या पायमोज्यावरून हळूच हात फिरवला; न जाणो, तसाच माझ्यावर प्रसंग यावयाचा. तेव्हा आधीच उठलेलें बरें असें समजून मी भराभर चालूं लागलें. मला वाटतें, या भागांत हिंदी बायका फारशा दृष्टीस पडत नसाव्या. त्यामुळे एखादी आपल्याकडची बाई पाहिली की तिच्याविषयीं लहानथोर, गरीबश्रीमंत सगळ्यांच्यांत एकदमच कुतूहल उत्पन्न झालेलें दिसतें. लंडनमध्ये मात्र हा अनुभव फारसा येत नाही. एकतर तेथे आधी पृथ्वीवरचे सगळ्या तऱ्हेचे लोक पाहावयाला मिळतात. शिवाय हिंदी लोकही इतके वावरत असतात की थोडीशी कामगार वस्ती किंवा अशींच कांही ठिकाणें

सोडलीं तर लोकांचें विदेशीयांविषयींचें नावीन्यच नाहीसें झालेलें असतें.

अर्थात् मला त्या लहान मुलांचें कुतूहल अगदी स्वाभाविक वाटतें. पण विदेशांत मोठ्या माणसांचे सुद्धा केव्हा केव्हा असे गमतीचे अनुभव येतात व मग बाकी आपल्याकडे येणाऱ्या युरोपियन बायकांच्या अनुभवांची आठवण होऊन मनुष्यस्वभाव सगळीकडे कसा सारखा असतो याची गंमत वाटते !

एक दिवस मी गडबडीने रस्ता ओलांडून जाण्याचा प्रयत्न करीत होतें. "हं कृपा करून थांब. हा लाल दिवा आहे तोंपर्यंत रस्ता ओलांडा-यचा प्रयत्न करूं नको." कोणी तरी माझ्या खांद्यावर हात ठेवून मला थोपवून धरलें. मागे वळून पाहतें तों एका म्हाताऱ्या बाईने मला अडवल्याचें आढळून आलें. तिचें तें करणें चमत्कारिक भासलें तरी तिच्या चेहऱ्यावर व हसण्यांत तिचा सज्जनपणा प्रतीत होत होता. मीही तिच्याकडे पाहून हसलें व आम्ही बरोबरच रस्ता ओलांडला

"मला तुझ्या चपला भारी आवडल्या. येथे अशा चपला मिळत नसतील नाही ?"

"मला नाही वाटत मिळतील म्हणून. तिकडूनच मागवाव्या लागतील तुम्हांला पाहिजे असल्या तर !"

"किती छान व आरामशीर वाटतात तुमच्या वाहणा. नाहीतर आमचे बूट. माझीं बोटें तर मुडपतात. त्यांतून अलीकडे मला जास्त त्रास होतो म्हणून विशेष....बरें तुला संस्कृत येतें का ?"

एकाएकी विचारलेल्या या प्रश्नाचा मला अर्थच कळेना.

"हो येतें तर. मी संस्कृत घेऊनच ग्रॅजुएट झालें आहे."

"अस्सं !" तिच्या तोंडावर समाधानाचें स्मित पसरलें.

"हें पाहा, तुला थोडी तसदी देतें, पण माझें घर येथून जवळ आहे, तेथे येतेस का ! माझी मुलगी तेथे आजारी आहे आणि तिला हिंदी लोकांना भेटायला फार आवडतें. ती कनी एकदा फार आजारी होती, त्या वेळीं एका हिंदी साधु पुरुषाने तिला एक संस्कृत पवित्र मंत्र लिहून

दिला व त्याचें पठण करायला सांगितलें. आणि तेव्हापासून तिला किती तरी बरें वाटलें. किती आश्चर्यकारक असला पाहिजे तो मंत्र !"

बोलतां बोलतां मी तिच्या घरीं अनपेक्षित पाहुणचार घ्यावयाला गेलें. तिची मुलगी खरोखरच आजारी दिसत असून एका आरामखुर्चीवर पडलेलीच होती.

"Oh! किटी, हें बघ कोणी तरी तुला भेटायला आलें आहे." असें म्हणून तिने माझी कशी गाठ पडली त्याची हकीकत सांगितली व अखेर, "तिला संस्कृत कळतें, ती तुला त्या मंत्राचा अर्थ सांगूं शकेल." म्हणून आनंदाने तो मंत्र मला दाखविण्याविषयीं तिला आग्रह करूं लागली.

'हें काय आई' म्हणून मुलीने जरा अळंटाळं केली. पण तिलाही इतक्या त्या पवित्र मंत्राचा अर्थ जाणण्याची उत्सुकता होतीच. अखेर दोघींनी मिळून एक चुरगळलेला असा बारीकसा कागद माझ्या पुढे केला. कागद साफसूफ करून रोमन लिपींत लिहिलेला तो संस्कृत मंत्र मी वाचूं लागलें. मलाही त्या मंत्राचा परिणाम ऐकून तो पाहण्याची उत्सुकता उत्पन्न झाली होतीच. पण वाचतें तों काय, नेहमीचा संध्येंतील गायत्रीमंत्र !

"Oh, तो कांही गूढ पवित्र आश्चर्यकारक मंत्र असेल नाही ?" विस्फारित डोळ्यांनी ती मला वाचतांना पाहून उद्गारली.

मीही तितक्याच गंभीरतेने उत्तर दिलें. आणि तो भाव पाहतांच तिचा विश्वासभंग करणें माझ्या जिवावर आलें.

"खरंच हा कांही तरी गूढ पवित्र मंत्र आहे. मला त्याचा अर्थ कळत नाही !"

बाहेर पडल्यावर मात्र मला हसूं आल्याशिवाय राहिलें नाही.

   

मँनचेस्टरच्या कामकरी वर्गाच्या चळवळी पाहत असतां त्यांचीं घरें कशीं असतात हें पाहण्याची मला फार उत्कंठा होती. पुष्कळ मजुरांच्याकडून कामकरी वर्गाकरितां कार्पोरेशनने बांधलेल्या वस्तीचा

नाकें मुरडून केलेला उल्लेख मी ऐकला होता. तेव्हा खरोखर हीं घरें आहेत तरी कशीं हें पाहण्याची माझी इच्छा होती.

लंडनमधल्या गरीब लोकांच्या अगदी घाणेरड्या वस्तींत जाऊन मी स्वतः पाहिलें होतें. आमच्या इकडील मजुरांच्या मानाने तीं घरें किती जरी चांगलीं असलीं तरी लंडनच्या मानाने खासच गचाळ होतीं. त्यामुळे Down with slums अशी एकच हुल्लड चोहोकडे उटलेली होती. अर्थात् मॅन्चेस्टर तर आधीच गचाळ, असें माझें मत झालेलें. त्यांतून कधी कधी मॅनचेस्टरच्या बाहेर जाण्यास शारबॅन्क गाठण्याकरितां म्हणून गरीब वस्तींत उभी असतां तेथल्या घरांविषयीं माझें मत तितकेंसें अनुकूल झालें नव्हतें. तेव्हा ही खास म्हणून बांधलेलीं घरें कशीं आहेत, त्यांत नाक मुरडण्याजोगें एवढें काय आहे, हें एकदा पाहावें तरी, म्हणून मी व एक अमेरिकन मुलगी अशा दोघी बरोबर निघालों.

इष्ट स्थळी आमची बस् थांबली असतां तेथून कांही अंतरावर भोवती बगीचा असलेलीं लहान लहान घरें आम्हांला दिसूं लागलीं. आम्ही उतरलों त्या वेळीं अगदी मोत्यासारखें चोहोंकडे ऊन चमकत होतें, त्यामुळे भोवतालची बाग व तीं घरें फारच छान दिसत होती. पाटलांच्या मुंडाशाप्रमाणें त्यांचीं तांबडीं छपरें त्या उन्हांत तरी खालच्या हिरव्या पार्श्वभूमीवर फारच उठून दिसत होतीं.

आम्ही जवळ आलों. आणि जवळ आल्यावर सुद्धा माझें त्या घरांविषयीं बिलकुल वाईट मत झालें नाही. उलट त्या एक मजली लहान इमारती पाहून तर मला, मजूरवस्ती असावी तर अशी, असें वाटलें. पण ह्या बाहेरच्या देखाव्याने आमचें समाधान होत नव्हतें. आम्हांला दोघींनाही आंतून तीं घरें पाहण्याची दांडगी इच्छा होती.

मी माझ्या विदेशीपणाचा पुरेपूर फायदा घेऊन मनाचा घडा केला व एका दारावर टकटक केलें. माझ्या अपरिचित पेहरावामुळे बहुधा ती घराच्या खिडकीच्या पडद्याआडून माझ्याकडे पाहातच

असावी. कारण ती ताबडतोब पुढे आली. मला ती प्रत्यक्ष आल्यावर मात्र जरा गोंधळल्यासारखें झालें. पण तिचा चेहरा पाहून धीर धरून मी विचारलेंच. "हें पहा, मी येथे एक कामकरी वर्गाच्या चळवळीची विद्यार्थिनी आहें. पुस्तकांत मी कामकरी वर्गाविषयीं पुष्कळ वाचतें पण मला कधी प्रत्यक्ष पाहावयाला मिळालें नाही. तर तुमची हरकत नसल्यास—" "हो हो, या तर, छे छे कांही हरकत नाही." असें म्हणून अगदी हास्यमुखाने तिने आम्हांला आंत नेलें. "ही पहा पॅन्ट्री (कोठी), ही बैठकीची खोली आणि ह्या दोन बेडरूम्स. ओ ! त्या जरा अस्ताव्यस्त आहेत, नाही तर......" "छे छे, मला कल्पना आलीच."मी चटकन् उत्तरलें. "आणि ही आमची बाथरूम. येथे हा चांगला बाथ सुद्धा बसवला आहे." ती अभिमानाने दाखवूं लागली व शेवटीं आमच्या घरीं आम्ही चांगला आठवड्यांतून दोनदा बाथ घेतों म्हणून अगदी गंभीर चेहऱ्याने आपली स्वच्छता व महत्व तिने माझ्या मनावर ठसविण्याचा यत्न केला. "Oh ! किती छान नाही ?"

"हंहं. खरंच हीं घरें छान आहेत नाही ? मला तरी वाटतें. तुम्हांलाही माझ्याप्रमाणें वाटतें हें ऐकून मला आनंद झाला."

"पण तुम्हांला माहीत आहे ?" हळू हळू ती गप्पा करण्याच्या रंगांत येऊन आपल्या विशाल छातीवर हातवारे करीत माना मोडून बोलूं लागली,

"कांही लोक मोठे मजेचे असतात. Snob असतात ते. हो, कामकरी वर्गांत सुद्धा अशी कांही मंडळी असतात. त्यांना हीं घरें आवडत नाहीत. कारण गरिबांचीं घरें, गरिबांची वस्ती म्हणून तीं वेगळीं काढलीं जातात. पण मी म्हणतें, आपण जर कामकरी आहोंत तर कामगाराची वस्ती म्हटलें म्हणून बिघडलें कोठे ? शिवाय जी गोष्ट चांगली ती वाईट थोडीच होऊं शकते ?"

"हो तें तर खरंच."

"शिवाय इतकी सोय असून भाडें कमी. मी माझ्या नवऱ्याला सांगितलं आणि आम्ही येथे आलों. माझा मुलगा, त्याला तर गेल्या दोन

वर्षांपासून काम नाही! म्हणून कसें बसें पैशाकडे पाहिलें पाहिजे ना!"

"हो हो, तर," असें म्हणत मी इकडे तिकडे नजर टाकीत होतें—कामकरी वर्गाची हीं घरें!

माझ्या मनांत विचार आ..... आमच्या मुंबईच्या हिंदु कॉलनींतील व पुण्याच्या डेक्कन कॉलनींतील किती तरी लोक येथे राहयला आनंदानें तयार होतील! घरांतील सामान, लहानसा घरींच तयार केलेला रेडिओ, घरांतील व्यवस्था–खरोखर आमच्या मध्यम वर्गांतील कुटुंबांत सुद्धा एवढें सामान आढळेलच असें नाही. आणि तरी हें मजुराचें–कामकरी माणसाचें–घर आहे!

आम्ही दोघी तिचे आभार मानून बाहेर पडलों. "What a tedious uniformity!" माझ्या अमेरिकन मैत्रिणीने उद्‌गार काढले, "आणि घरांत सोयी तर अगदीच नाहीत."



मी मात्र तिच्या उद्‌गाराने चकित झालें. आमच्याकडे एवढें तरी कोठे आहे? पण आम्ही कधी कुरकूर करणें शक्य आहे का? कसे तरी जन्माला आल्यासारखे दिवस काढावयाचे हें आमचें ध्येय. आमच्यांत असंतोष धुमसणार कसा व सुखाचीं स्वप्नें तरी आम्ही पाहणार कशीं! आमच्या सर्व जीवनावर निराशात्मक मायावादाच्या तत्वज्ञानाची एवढी गडद छाया पडलेली असते की सुखी आयुष्याची कल्पना सुद्धा करणें पाप असा आमचा समज होऊन बसतो. मग, मला माणसासारखें जगायला कमींत कमी इतकें पाहिजे, तें न मिळालें तर मी मनुष्यत्वाला सुद्धा पारखा होईन, म्हणून तेवढें तरी मिळवणें हा माझा हक्क आहे आणि मी तें मिळवणार, असा इकडील लोकांप्रमाणें आग्रह धरणें आमच्याच्याने कसें होणार!

१९३४.

# मॅन्चेस्टर व आसपास २

मी मॅन्चेस्टरच्या आसपास हिंडत होतें, त्या वेळीं केवळ असहकारितेनेच नव्हे इतर जागतिक कारणांनीही मॅन्चेस्टर भागाच्या कापडाच्या व्यापाराला चांगलाच धक्का बसला होता. कित्येक ठिकाणीं गिरण्या बंद असून कापडाचा उठाव होत नाही म्हणून माल पडून राहिला होता. मॅन्चेस्टरचीं तलम तलम धोतरें हिंदी बाजारपेठेंत विकलीं जात नाहीत म्हणून अखेर त्यांचीं Dusters करून विकण्यांत येत होतीं. आपली असहकारितेची चळवळ हें त्या वेळेपुरतें तरी दिखाऊ कारण झाल्यामुळे कामकरी वर्गांतही म. गांधी व त्यांची चळवळ काय, हें जाणण्याची चांगलीच उत्सुकता उत्पन्न झाली होती. मी जेथे जेथे गिरण्यांतून जात असें तेथे तेथे बायकापुरुष यांना माझ्याशीं बोलण्याचा कधी प्रसंग आला की पहिल्या प्रथम म. गांधीविषयीं व नंतर लगेच ही चळवळ काय आहे याविषयीं ते मला प्रश्न करीत !

ज्या बाईंनी मला पाठविलें होतें त्यांना अशा वेळीं जरा भीति वाटे. पण त्यांनी कांहीही प्रश्न विचारले तरी मला त्याचें कांही वाटावयाचें नाही, असें मी त्यांना आश्वासन दिल्यामुळे मला थोडा वेळ

कां होईना मजुरांशीं मोकळें बोलतां येई. विशेषत: एखाद्या ठिकाणीं जेवणाची वेळ असली की फारच मोकळें वाटे. कारण त्या वेळीं बऱ्याच बायका किंवा पुरुष माझ्या भोवती जमून माझ्यावर प्रश्नांची एवढी सरबत्ती करीत की अशा वेळीं मला उत्तरें देणें सुद्धा जड जाई. पण इतक्यांतही माझा अपमान करण्याची वृत्ति मला कोठेही दिसून आली नाही. मी इतक्या गिरण्यांतून व कारखान्यांतून फिरलें; कांही ठिकाण-च्या welfare च्या मुख्य बाईंनी वेळ असेल त्याप्रमाणें कामकऱ्यांना मला प्रश्न विचारण्याची संधि सुद्धा दिली. पण कोठेही मला ब्रिटिश मालावरील बहिष्काराच्या धोरणामुळे अपमानित होण्याचा प्रसंग आला नाही. जवळ जवळ प्रत्येक ठिकाणीं नीट, सरळ, अंतःकरणपूर्वक उत्तरें दिलीं की आपली असहकारितेची चळवळ सुद्धा त्यांना पटूं शके, असेंच माझ्या अनुभवास आलें. वास्तविक त्या चळवळींत खरा धक्का कोणाला बसला असेल तर त्यांनाच होय. पण त्यांच्यांतील जागृति व राष्ट्राभिमान हीं आपल्यापेक्षा कितीतरी पटीने प्रखर आहेत. यामुळे दुसऱ्या राष्ट्राची तीच भावना व तोच प्रयत्न जरी त्यांना घस सोसावयास लावणारा असला तरी सुद्धा त्यांना समजूं शकतो. अशा वेळीं प्रश्नोत्तरें मात्र कित्येक वेळां मजेचीं होत.

"पण तुम्हांला वाटतें, तकलीने सूत काढून तुम्ही सर्वांना कापड पुरवूं शकाल ?" एका फोरमनने मला विचारलें.

"छे तसें करणें शक्यच नाही. पण आमच्याकडे सुद्धा गिरण्या आहेत की !"

"हं, पण महात्मा गांधींचा जोर हातविणीचें हातांनी कातलेलें यावर आहेना!"

मला जरा सुचेनाच, कारण तें खरें होतें.

"हो आहे. पण त्यांची तकली म्हणजे कांही हातकानीचें व हातविणीचें कापड प्रत्येकानें पुढेही घेतलें पाहिजे याकरतां नव्हे. तें एक प्रतीक आहे. हिंदी माल, हिंदी उद्योगधंदे व यंत्रें कारखाने हिंदी असायला

पाहिजेत या अर्थाने त्यांनीं हिंदी जनतेपुढे ठेवलेली ही एक निशाणी आहे एवढेंच !"

खुद्द महात्मा गांधींना माझा ह्या युक्तिवाद किती नापसंत होईल याची मला कल्पना होती. पण माझ्या समर्थनाने त्यांचें मात्र समाधान झालें खरें. तेथला मजूरवर्ग आपल्या मानाने कितीतरी सुशिक्षित, जागृत व संघटित आहे. मी मॅन्चेस्टर, पार्क, या भागांत हिंडत असतां मला किती तरी वेळां कमालीचें आश्चर्य वाटे. गिरणीभोवती जागा असली की लगेच तेथे टेनिसकोर्ट, एखादी लहानगी क्लबरूम, लायब्ररी, हें पाहिलें की मला आमच्याकडच्या मजुरांची आठवण येई. बिचाऱ्यांना जेवण्याकरतां धड जागा नाही, तर बाकी गोष्टी कोठल्या ? येथे प्रत्येक गिरणीचा कॅन्टीन–म्हणजे जेवण्याखाण्याची व्यवस्था–हा एक मोठाच व महत्त्वाचा भाग असतो. त्यावर स्वतंत्र देखरेख करणारीं माणसें असतात. जेवायची मधली वेळ झाली म्हणजे जेव्हा आपली लहानशी किटली व जेवण घेऊन शेंकडो बायका किंवा पुरुष रांगेने एकत्र खातात, तेव्हा फारच गंमत दिसते. शिवाय किती तरी गिरण्यांतून औषधपाण्याची तर सोय आहेच; पण त्याशिवाय मजुरांना आजारी-पणांतून उठल्यावर चांगल्या हवेवर पाठविण्याची सोय सुद्धा केलेली आहे. पण ह्या सर्व गोष्टी त्यांना सहजासहजी मात्र मिळालेल्या नाहीत. त्याकरितां येथल्या मजुरांना संघटित होऊन किती तरी लढा करावा लागला आहे. तेव्हाच आता कोठे इतक्या सोयी होऊं शकत आहेत ! संघटितपणा हा येथल्या मजूर चळवळीचा विशेष आहे. शिवाय त्याला राजकीय जागृतीचें अस्सल पाणी दिलेलें आहे तें वेगळेंच. एंजिनिअर्स गिल्ड किंवा स्पिनर्स युनियन यांसारख्या संस्था इतक्या बलवान् व संघटित असतात की मालकांची त्यांविरुद्ध जावयाची छाती होत नाही.

मी एका ट्रेड युनियनच्या ऑफिसचें काम पाहावयास गेलें असतां तेथल्या तरुण सेक्रेटरीने मला विशेष जिज्ञासा आहे हें पाहून, जवळ जवळ ५० वर्षें संघटना करून, भांडणें करून, त्यांनी काय काय मिळवलें हें

सांगितलें. "तुम्हांला माहीत आहे ? येथल्या मालकांच्या मनांत आलें तर अजूनही ते १२ तास गिरणी चालवूं शकतील. कायदा अजून बदलेला नसल्याने त्यांना कायदेशीर विरोध होऊं शकत नाही. पण आम्ही येथल्या मजूरवर्गाने आमचा दिवस ८ तासांवर आणला आहे. तथापि आमचें एवढयावर सामाधान नाही. अजून किती तरी जावयाला पाहिजे आहे !" त्याचा तो आवेश व आत्मविश्वास पाहून मला किती हेवा वाटला !

पुरुष मजुरांची इतकी संघटना असली तरी त्या मानाने बायकांच्यांत मात्र संघटनेची तितकी आस्था येथेही दिसत नाही.

" मला तर बायका कधी जाग्या होतील असें वाटतच नाही, " एक मध्यमवयीन गिरणी कामगार माझ्याजवळ, बायकांसंबंधीं बोलत असतां, उद्गारली.

"पहिल्या प्रथम नवीन कामाला लागतात तेव्हा ठीक असतें. यूनियनच्या मेंबर होतात, सारें होतें. विशेषतः सोशलच्या दिवशीं पार्टनर घेऊन नाचण्याची कोण हौस. पण एकदा लग्न झालें की त्यांच्यांत राम राहतच नाही. लग्न झालें की लागल्या अळंटळं करावयाला. मग तितकें यूनियनमध्ये त्यांचें लक्षच राहत नाही." ती बाई चांगली अनुभविक असून ट्रेड यूनियनच्या चळवळींत प्रामुख्याने भाग घेत असे. शिवाय चांगली हुषार पण होती. अगदी एका साध्या कामकरी मुलीपासून तिने गिरणींत बराच चांगला दर्जा संपादन केला होता. शिवाय तिला यूनियनच्या कामाची हौस असल्याने ती पुढे चांगलेंच नांव काढील असें वाटतें आहे, असें माझ्या बरोबरच्या बाईने सांगितलें. तेव्हा मी तिच्याकडे खरोखरच आश्चर्याने पाहूं लागलें. कारण आमच्याकडे हा देखावा पुरुष कामगारांत सुद्धा दिसत नाही, मग बायकांत कोठून ! स्वतःच्या हिंमतीवर आपला मार्ग शोधणारी ही बाई शिडीच्या वरच्या टोकाला नाही पोचली तरी एक दिवस खासच वर जाईल–एला विल्किन्सन सारखी होईल. पण अशा बायका किती असतात !

"आमचें आज रात्रीं सोशल आहे. याल का ?" तिने मोठ्या उत्साहाने मला विचारलें व एकदा मजुरांचा हा काय प्रकार असतो हें पाहावें म्हणून मीही कबूल केलें.

रात्रीं तेथे जाते तों किती भिन्न व रंगल जमाव तो! या सगळ्या कामकरी वर्गाच्या मुली असें म्हणावयाची माझी तरी छाती नव्हती. अगदी नव्या, अद्ययावत् फॅशनच्या नाचायच्या पोषाकांत एकएक चमकत होती. दिवसा दिसणारी थोडीफार उदासीनता पार मावळून स्त्रीपुरुषांचे चेहरे नुसते फुलले होते. तरुण मुलांमुलींचे पाय तर नुसते नाचायकरतां वळवळत होते! झालें. एकदाचा पियानो सुरू झाला व कितीतरी जोडपीं पटापट एकमेकांचे हात धरून नाचूं लागलीं. काय बसल्या असतील तर त्या म्हाताऱ्या बाया, पुरुष व मी. बाकी सर्व आनंदाच्या उत्साहाच्या भरांत कैफ आल्यासारखीं होऊन भराभर एका पाठोपाठ एक सूर झाले की नाचत होतीं. बसलेलें कोणी असेल तर कांही म्हाताऱ्या बायका, पुरुष, व मी.–पण आमचीं‌ही मनें तेथे उसळलेल्या लाटांनी स्वस्थ बसत नव्हतीं. कानांत सूर घुमत होते व पायही न कळतां आपोआप ताल देत होते.

चित्रविचित्र रंगीत कागद व दिवे यांनी सजवलेल्या त्या हॉल-मध्ये बसल्याबसल्या माझ्या मनांत येऊं लागलें, मजुरांच्या चळवळीचें हें अंग कदाचित् तितकें महत्त्वपूर्ण व गंभीर नसेल; पण बाकीच्या खड-तर जीवनांत असले समारंभ व ठिकाणें म्हणजे खरोखर विसाव्याचींच ठिकाणें होत. त्यांनी जीवनांत किती रंग भरला जातो. आपल्या यूनियनने काय काम केलें हें कदाचित् या पोरी पुढे विसरून जातील. पण येथे घालविलेले दिवस त्यांच्या आयुष्यांतील एक रम्य काल म्हणून त्यांच्या स्मरणांत राहतील–नव्हे त्याकरतांच ह्यांतील किती तरी यूनियनच्या मेंबर होत असतील!

१९३४

दृश्य सतरावें

# मँन्चेस्टर व आसपास ३

मनुष्याचें मन मोठें विचित्र असतें. या भागांत हिंडत असतां मला गरीब लोक पाहृयला मिळत होते, कामकरी वर्ग मी पाहत होतें, पण अजून आपल्याकडल्या सारख्या अगदी अडाणी बायका मला पाहृयला मिळाल्या नव्हत्या; त्याकारणाने मला जरा चुकल्यासारखें वाटे. कोठेही गेलें तरी विसाव्या शतकाचा मला विसर पडूं शकत नसे. स्वित्झरलंडमध्ये असेंच झालें. जगद्विख्यात आल्प्सूची हिमाच्छादित शिखरें पाहत असतांही माझें समाधान होऊं शकलें नाही. अगदी उंचांतल्या उंच ठिकाणीं जा, तेथे सुद्धा हाटेलें व बर्फातील खेळायची साधनें अगदी हजर. तुम्हांला कधी निसर्गाच्या जवळ असें वाटूंच शकत नाही. तसेंच येथे झालें.

कापडाच्या किमतींत फरक असेल, पण तेच ठराविक फॅशनच्या साच्याचे पोषाक, केसांचीं हजार तऱ्हांचीं वळणें–यांत गंमत असेल, नाही असें नाही, पण यापेक्षा मला कांही तरी निराळें पाहृयला पाहिजे होतें. आणि खरोखर ही गोष्ट माझी मलाच मी पाहीपर्यंत कळली नाही.

एके दिवशीं अशीच मी एक गिरणी पाहायला गेलें होतें. ती अगंदी एका खेड्यांत वसली असून तो गावही अजून फारसा वाढला

नव्हता. त्यामुळे खेड्यांतील जीवन व वातावरण तेथे अजून ऐंशी टक्क्यांनी तरी अस्तित्वांत होतें.

गिरणी लहानशीच होती, पण गिरणींत गेल्याबरोबर मला नेहमीच्या वातावरणापेक्षा किती तरी निराळें वातावरण दिसूं लागलें. तेथे फारशा बायका नव्हत्या. शंभर दीडशें असतील नसतील. पण त्यांच्या पायांतील बूट अजून बदललेले नसून गाड चढावासारखे खाडखाड वाजणारे बूट वाजवीतच त्या गोटयांनी बनविलेल्या रस्त्यांवरून चालत होत्या. चांगले जाड उबदार कपडे, पांघरायला एक शाल, केसांचीं वळणेंवाकणें नसून सरळ मागे बांधलेले, डोक्याला एक लहानसा उबदार रुमाल बांधलेला—अशा थाटांत काम करीत असलेल्या त्या बायकांना पाहून मला भारी मजा वाटली.

मी तेथल्या बाईला म्हटलें सुद्धा "हें अगदीच लहान खेडें आहे वाटतें ? "

"हो. अगदीच खेडें आहे. शिवाय गिरणी पण अगदी नवीन आहे."

"तरीच इतके दिवस इकडील भागांत हिंडत असतां आज मला लंडनमधल्या कपडयाच्या व बुटाच्या दुकानांचा विसर पडलेला आहे. नाही तर सगळीकडे पोषाक पाहत असतां कोणत्या तरी स्टोअर्सचा किंवा हाऊसचा अदृश्य हात मला त्या पोशाकांत दिसून येतो. "

" छे छे ! असला पोषाक ! असला पोषाक करायला अजून या बायकांना एक पिढी जावी लागेल ! आज तुम्ही अगदी खरें खेडवळ इंग्लंड पाहतां आहांत !"

आम्ही बोलत होतों एवढयांत मधली जेवायची सुट्टी झाली. येथे कॅन्टीन वगैरे कांही नव्हतें. फक्त प्रत्येकीच्या किटलींत चहाचें आधण मात्र एका बाईने ओतलें व बायका जेवायला बसल्या. माझ्या बरोबरच्या बाईने मला सांगितलें, "या सगळया बायकांना नुसतें एकत्र

जेवायला बसवायला सुद्धा मला जवळ जवळ एक वर्ष लागलें. त्या तयारच होत नसत. शिवाय काटेचमचे कोठले! भराभर हातांनी खावयाच्या. अजून सुद्धा ती पहा, तिला कांही काटा धरतां येत नाही." म्हणन हळूच तिने मला खूण केली.

मला मात्र गंमत वाटली. आमच्याकडील लोकांप्रमाणेंच त्यांचें काम धीरे धीरे चाललें होतें. घरची शिदोरी पुढे पसरून त्या खात होत्या. तेथेंच घरच्या गप्पागोष्टी पण चालत असाव्यात. "यांना लिहितांवाचतां येतें?" मी विचारलें. "हो, तरुण पोरींना येतें. पण त्या म्हाताऱ्यांना नाही येत. त्या आपल्या नांवाच्या जागीं क्रॉसच काढतात!" इंग्लंडांतील अशिक्षित गांवढळ भाग पाहण्यांत मला मजा वाटत होती! आपण या देशांतील चांगलें पाहायला व ऐकायला इतकीं सरावलेलीं असतों की तेथेही असा प्रकार असूं शकेल ही कल्पना होत नाही. मी गिरणीच्या बाहेर आलें. बाहेरून कांही मुली आपल्या आयांचें जेवण घेऊन येत होत्या. थंडीनें गाल लाल झालेले, पायांत जाडे बूट, अंगांत जाड गरम कफनीसारखें अंगातलें, केस स्वैर उडत असलेले–मला वर्डस्वर्थच्या कवितेची आठवण झाली. I met a rustic cottage girl...etc.

मी मोटरमध्ये बसून हळूहळू चालूं लागलें. चांगलें उन्ह चमकत होतें. भोवतालच्या भागांतून कांही म्हाताऱ्या बायका काटक्या जमा करीत हिंडत होत्या–

मला गिरणीच्या दृष्टीने तेथे फारसें पाहण्याजोगें नव्हतें. पण तेथला तो शांत देखावा व खेडवळ वातावरण मला अजून दिसतें आहे.

१९३४

दृश्य अठरावें

# हेल्सनोर !

वास्तविक वाळवीने खाल्लेल्या थिवळया लहानशा कापडाच्या तुकड्याप्रमाणें नकाशांत दिसणारा जर्मनीच्या उत्तरेस असलेला एक बेटांचा समूह यापलीकडे डेन्मार्कची कांही सुद्धा कल्पना माझ्या डोळ्यांपुढे येत नसे. पण लंडन स्कूलमध्ये अभ्यास करीत असतांना मात्र माझें डेन्मार्कविषयीं बरेंच कुतूहल वाढलें. औद्योगिक क्रांतीच्या तडाक्यांत सारें युरोप बदलत असतां, लहान दुकानदार, लहान कारखानदार, लहान शेतकरी सर्व नाहींसे होऊन सर्व बड्या गोष्टींचें साम्राज्य चालू असतां, जुनें व नवें यांतला बरोबर मध्य गाठून मोठ्या जोमाने टिकाव धरणारें चिमुकलें आदर्श राष्ट्र म्हणून मी त्याकडे पाहूं लागलें. त्यामुळे युरोपच्या यात्रेंत डेन्मार्कमध्ये पण थोडे दिवस घालवावयाचे असें मी ठरवलें.

सरते शेवटीं उन्हाळयामध्ये मी आणि आणखी दोघी हिंदी विद्यार्थिनी एके दिवशीं सकाळीं कोपनहेगनला उतरलों.

रात्रीं प्रवास करतांना मध्येच आमची गाडी बोटीवर चढली कशी आणि आम्हांला अलगद डेन्मार्कमध्ये उतरवून घेऊन चालली कशी हा चमत्कार पाहण्याची मला भारी उत्कंठा होती. पण प्रवासाच्या शिणानें

हा सर्व प्रकार पाहून सुद्धा झोपेंत अर्धवट पाहिल्यासारखाच वाटला. मात्र सकाळीं चांगलीं उन्हें पडल्यावर आमची गाडी कोपनहेगनला पोचली व आम्ही अगदी पुऱ्या जाग्या झालों.

प्लॅटफार्मवर उतरतांच आता हेल्सनोरला जाणारी गाडी कोठे व कशी गाठायची हा आमच्यापुढे प्रश्नच पडला. 'हेल्सनोर हेल्सनोर' म्हणून विचारावे तर आमच्या उच्चारामुळे त्यांना कळत नसे व कळून त्यांनी कांही सांगितलें तरी आम्हांला त्याचा बोध होत नसे. आता काय करावें या विवंचनेंत आम्ही असतां एक कॅमेरा घेतलेला गृहस्थ व बाई आम्हांला परकी असें पाहून आमच्याच रोखाने येत असलेलीं दिसलीं.

"महाराज, आपल्याला इंग्रजी कळतें का ?"

"हो समजतें, कां ?"

"आपण हेल्सनोरला जाणारी गाडी कोणत्या प्लॅटफॉर्मवर थांबते तें कृपा करून सांगाल काय ? "

"माझें जर एक काम केलेंत तर सांगेन."

परक्या देशांत एका तिऱ्हाईत गृहस्थाची अशा प्रकारची विनंती ऐकून जरा गंमत वाटली. पण त्याला कोठला धीर निघायला. "मला तुमची मुलाखत पाहिजे आहे." त्याने एकदम सांगून टाकलें.

उभ्या जन्मांत आमच्यावर आलेला मुलाखतीचा हा पहिलाच प्रसंग होता. पण युरोपच्या उन्हाळ्यांतले मजेदार दिवस, त्यांतून रोज नवी ठिकाणें, नवे चेहेरे व नवे मासले पाहतां पाहतां आमच्या विनोदाला एक प्रकारची चांगलीच धार चढली होती. त्यांतही डेन्मार्कमधलें सुखकर उत्साहवर्धक वारें सकाळच्या प्रहरीं अंगावर खेळत असतां आम्ही काय वाटेल तें साहस करायला तयार झालों असतों. मग हें तर काय ! आम्ही हसून म्हटलें, "विचारा काय हवें तें ! "

"तुम्ही हिंदी आहांत नाही ? "

"हो. आम्ही हिंदुस्थानांतल्याच आहों. "

पुढच्या प्रश्नाने मात्र आम्ही गार झालों.

"तुम्ही राजकन्या आहांत काय?"

आता मात्र आमच्याने हसल्यावाचन राहवेना.

"राजकन्या असतों तर अशा लहानशा बॅग्ज घेऊन कशा उतरलों असतों? मोठा लवाजमा, हत्ती, उंट, निदान सामानाच्या १०० पेट्या तरी खास बरोबर आणल्या असत्या." आमच्यापैकी एकीने उत्तर दिलें.

"आम्ही अगदी साध्या विद्यार्थिनी आहोंत."

"अस्सं! मग येथे काय उद्देशाने आलां?" त्यानेही हसत हसत विचारलें.

"तुमच्या देशांतील फोक स्कूल्स, सहकारी तत्वावर चाललेले शेतकरी संघ वगैरेविषयीं आम्ही पुष्कळसें वाचलें म्हणून तें पाहण्याकरतां मुद्दाम आलों आहों."

"फार चांगलें. तुम्ही हेल्सनोरला जाणार काय? तेथल्या आंतरराष्ट्रीय संस्थेतील मंडळी तुम्हांला हें चांगलें दाखवतील.

"बरं. महात्मा गांधींविषयीं मला थोडें सांगतां का? त्यांची शेळी कशी आहे!"

"शेळीबद्दल माहिती नाही." एकीने हसत उत्तर दिलें. "मात्र त्यांची प्रकृति चांगली आहे."

"तुम्हांला त्यांचें शांततामय प्रतिकाराचें तत्त्व पटतें काय?" आपण राजकारणांत तर शिरत नाहीना? एकीला शंका आली व ती गप्प बसली.

"हो न पटायला काय झालें? दुसरा आम्हांला इलाजच नाही." मी उत्तर दिलें.

"पण ब्रिटन त्याने बधेल असें तुम्हांला वाटतें?"

"आम्हांला फार असंतुष्ट करूनही त्यांना चालावयाचें नाही त्यामुळे बधावेंच लागेल."

"अच्छा. तुमची वेळ होत आली, तुमची गाडी मी चुकवूं इच्छीत नाही." असें म्हणून त्याने आम्हांला गाडींत बसवून दिलें, आमचे आभार मानले व चालता झाला.

आम्ही मात्र मुलाखतीचीं–विशेषतः राजकन्यांविषयीं त्याच्या कल्पनेची–आठवण करीत हसत हसत हेल्सनोरची वाट चालूं लागलों.

तेथे गेल्यावर जेव्हा का तीन हिंदी सौन्दर्यदेवता म्हणून आमच्या चमकणाऱ्या दातांचें, कुड्यांचें व पोषाकाचें वर्णन करून काढलेला फोटो आम्ही पाहिला, तेव्हा मात्र आम्ही अगदी पोट धरधरून हसलों.

   

मिस मेयोच्या पुस्तकांतील दोन चार महिन्यांच्या अनुभवाने रेखाटलेलीं हिंदुस्थानचीं हिडीस चित्रें पाहून, चार आठ दिवसांच्या वरवरच्या पाहण्याने, भाषा समजत नसतां, आम्ही एखादा देश पाहिला अशी कोण फुशारकी मारूं शकेल ? निदान मला तरी तसें म्हणतां येत नाही.

अर्थात् एक फरक मोठाच आहे. आम्ही पाश्चात्य देशांतून गेलों की तेथे प्रेक्षणीय तेवढेंच पाहून येतों. पण पाश्चात्य स्त्री-पुरुष मात्र जेव्हा आमच्या देशात येतात तेव्हा प्रेक्षणीय असेल तें तर पाहतातच, पण त्याहीपेक्षा जें अप्रेक्षणीय असेल तें पाहण्याची त्यांची खरी उत्कंठा असते. सुधारलेलें हिंदुस्थान त्यांना पाहायला नकोच असतें. रानटी अप्रागतिक असेंच हिंदुस्थान पाहण्यासाठी त्यांचे डोळे तहानेलेले असतात व आपल्याकडल्या मिशनरी संस्था किंवा दुसरे असेच इतर सेवासंघ त्यांना असल्या गोष्टी भरपूर दाखवून त्यांचें समाधान करतात.

मी काम करीत असतां असले प्रसंग माझ्यावर पुष्कळ वेळां आले आहेत.

एखाद्या महिना दीड महिन्याच्या यात्रेकरितां या बायका हिंदुस्थानांत यावयाच्या. आम्ही त्यांना शहरांतील अगदी घाणेरड्या भागांत

घेऊन जावयाचें व मग तें पाहत असतां त्यांनी Oh ! How lovely! Charming ! असे उद्‌गार काढावयाचे. खरें म्हणजे अशा रीतीने आमच्यांतील गटारघाण त्यांना दाखवावयाचें माझ्या जिवावर येई. पण नाइलाज असे. त्यांतून असे उद्‌गार ऐकले की माझा संतापच होई. एकदा माझ्या एका सहकारी भगिनीने 'केवळ सवयीमुळे त्या असले उद्‌गार काढतात झालें ! असें सांगितल्यापासून मी जरा शांत झालें होतें. पण लंडनला आल्यावर हिंदुस्थानांतून आलेल्या असल्या बायकांचीं व्याख्यानें ऐकण्याचा मला प्रसंग आला आणि मला जी शंका होती तीच अगदी बरोबर ठरली.

बाकी पाहिलेला सुधारलेला हिंदुस्थान त्यांच्या स्मृतींतून केव्हाच गळून पडला होता. त्यांच्या व्याख्यानाचा सारा भर, सर्व हिंदुस्थानांत अजून इतक्या तऱ्हेची परिस्थिति नांदते आहे व सरकार आणि मिशनरी ती सुधारण्याचा प्रयत्न करीत आहेत, या मुद्द्यावर होता. या एका सुरावरून अशीं व्याख्यानें पुढे कशीं होत असतील याची कल्पना येईलच. त्यामुळे कित्येक वेळां आमच्याबरोबर शिकणाऱ्या इंग्रजी विद्यार्थिनीही अगदी गार होऊन 'तुमच्या देशांतील तुम्ही कोणी तरी अत्यंत पुढारलेल्या, पाश्चात्य बनलेल्या वर्गांतल्या असाल नाही !' असें विचारीत !

असो. अर्थात् डेन्मार्कला असें कांही पाहावयास मी गेलें नव्हतें व गेलें असतें तरी तें फारसें दिसलें नसतें. त्यामुळे डेन्मार्कला मी गेलें म्हटलें की एखाद्या चित्रफलकाप्रमाणें तेथल्या लहानमोठ्या कांही प्रसंगांचीं दृश्यें माझ्या मनश्चक्षूंसमोर उभीं राहतात व त्यांनाच मी डेन्मार्क म्हणतें.

   

हेल्सनोरच्या आश्रमांत आम्ही उतरलों. तेथल्या मंडळीच्या किंचित् गावठी पण मनमोकळ्या व प्रेमळ वागणुकीने आल्याबरोबरच आम्हांला फार बरें वाटलें. अगदी हिंदुस्थानांत असल्यासारखें वाटत होतें.

पहिल्याच दिवशींची गोष्ट. मी माझ्या खोलीच्या खिडकींतून बाहेर पाहत होतें. तेथल्या शांत, रम्य, हिरवळीने प्रसन्न झालेल्या वातावरणाने मला किती तरी आनंद होत होता. सभोवार खरोखर पाचूप्रमाणें उन्हांत चमकत असलेली हिरवळ, मध्येच रंगीत फुलांची शोभा. विशेषतः बायुलहरींनी फुलें खाली वर करूं लागलीं की नाकांतील नथ उडवीत चालणाऱ्या बायकांप्रमाणें फारच गंमत येई. त्यांतही तीन पांढरीं शुभ्र करडें त्याच हिरवळीवर खेळत असलेलीं पाहून मला त्यांच्याबरोबर खेळण्याची फार इच्छा झाली. पण एवढ्यांत अगदी जवळ एकदम दिसूं लागलेल्या मनोहर दृश्यामुळे मी जागच्या जागीं थबकलें. उन्हांत चमकणारी हिरवळ, त्यांतून केलेली रंगीबेरंगी फुलाची पखरण व अशा रम्य पार्श्वभूमीवर तिघी तरुण डॅनिश मुली हातांतल्या टोपलींत कसलीशी फळें घेऊन संस्थेकडे येत होत्या. मला वाटतें त्यांचें वयही १८–१९ च्या पुढे नसेल. पण त्यांची ती उंची, भरदार सतेज आंगकाठी, अत्यंत गौर वर्ण, स्वैर उडत असलेले सोनेरी केस, सकाळच्या दवाच्छादित अर्धस्फुट गुलाब पुष्पाप्रमाणें सतेज गुलाबी गाल आणि खरोखर आकाशाशीं स्पर्धा करणारे निळे डोळे—मी त्या मनोरम दृश्याकडे पाहातच राहिलें.

फरान्स, इंग्लंड, या देशांतून मी सौंदर्याची परेड पाहिली होती. वेषभूषेच्या आधुनिक सर्व साधनांनी सज्ज होऊन जणू कुसुमधनू रोखल्याप्रमाणेंच त्या आमच्याकडे पाहत पाहत स्टेजवरून मिरवत पण त्यांतल्या एकींतही ह्या सौंदर्यांतील सहजपणा, ताजेपणा, टवटवी दिसून आली नव्हती.

एखादें फूल ताजें खुडून पुढे धरावें इतका ताजेपणा, टवटवी त्यांच्या सर्वांगावर दिसत होती.

त्यांचे झगे अगदी साधे होते. नव्हे खेडवळच असतील. पण त्यांना पाहून मात्र 'दूरीकृताः खलु गुणैः उद्यानलता वनलताभिः' या दुष्यंतवचनाची मला आठवण झाली.

पुढे मला आढळून आलें की असें दृश्य कांही येथे दुर्मिळ नाही. भोवतालच्या फुलांत आणखी हींही कित्येक फुलें आपल्या तेजाने ओसंडत येथे चोहोंकडे विहरत आहेत !

मला वाटतें मी पुरुष असतें तर खरोखर एखाद्या डॅनिश मुलीशींच लग्न केलें असतें.



शेतकरी आणि सुखी हा शब्दप्रयोगच आपल्याकडे किती दुर्मिळ झाला आहे. गरीब बिचारा रात्रंदिवस कष्ट करून काळी करीत असतांही दरवर्षी कर्जांत खचतच जाणारा एक मनुष्यप्राणी अशीच आपली त्याविषयीं समजूत होऊन बसली आहे. आणि ती खरीही आहे. त्यामुळे सुखी शेतकऱ्यांचें कुटुंब पाहणें म्हणजे खरोखर एक अद्भुत प्रकार पाहत असल्यासारखें मला वाटत होतें.

आम्ही ज्याच्याकडे गेलों होतों तो कांही फारसा मोठा शेतकरी नव्हता, लहानच होता. पण आमच्याकडे शेतकऱ्याच्या तोंडावर दिसणारें दैन्याचें दीन, उदासवाणें चित्र त्याच्या तोंडावर दिसत होतें काय ! बाकी का दिसावें ? त्याचें जीवन आमच्याकडील शेतकऱ्या-प्रमाणें परिस्थितीने करपून गेलेलें नव्हतें. लहानशा पण जोमाने वाढणाऱ्या रोपट्याप्रमाणें त्याचें आयुष्य सुखाने व जोमाने वाढत होतें. मग त्याच्या तोंडावर उदासपणाची कळा कशी दिसणार ? मोठ्या अभिमानाने त्याने आपल्या गाई, कोंबड्या, डुकरें आम्हांला दाखविलीं व हसत म्हणाला, " तुम्ही ब्रिटनमधून आला नाही ? "

"मग तुम्ही आमचें लोणी, अंडीं आणि बेकन खाल्लेंच असेल ! तुम्हांला माहीत आहे..." असें म्हणत एक लहानसें पांढरें, गुलाबी दिसणारें डुकराचें पिलू पटकन त्याने हातांत उचललें व गोंजारीत आमच्याकडे पाहून डोळे मिचकावीत हसत हसत म्हणू लागला, "ब्रिटनला सकाळचा ब्रेकफास्ट आम्ही पुरवतों. Oh ! पण ते लबाड लोक आहेत. ते अलीकडे आमचा व्यापार कमी करून स्वतःचा खप वाढावा

म्हणून तेथल्या शेतकऱ्यांना किती मदत करीत आहेत ! लबाड, पक्के कावेबाज लोक !" असें म्हणत म्हणत त्याने पिलूं खाली ठेवलें.

जशा गाई, म्हशी, कोंबडया, बकऱ्या, तशींच डुकरें पाळावयाची ही कल्पनाच आपल्याकडील डुकरांच्या आठवणीने मला कशीशीच वाटली होती. त्यामुळे डुकरांच्या गोठ्यांत लहान लहान छोटींशीं पांढरट गुलाबी डुकरें पाहून मला खूप गंमत वाटली. मात्र एवढें खरें की डुकरें अत्यंत स्वच्छ राखलेशीं होतीं. पण याहीपेक्षा खरी गंमत कोंबड-वाडयांत दिसली. चोहोबाजूला जाळी लावून एक लहानसें आवारच तयार केलें होतें व त्यांत निदान शेंदोनशें कोंबडीं तरी दिसत होतीं. मध्यभागीं एक तरुण मुलगी हातांत मक्याचें टोपलें घेऊन मोठ्या शिताफीने चारी बाजूला दाणे भिरकावी व तिने दाणे फेकल्याबरोबर साऱ्या कोंबडया त्या बाजूला धावत जाऊन दाणे टिपण्याकरितां एकमेकींवर 'क्लक क्लक' आवाज करीत तुटून पडत. कोंबडे मात्र मध्येच दिमाखाने उभे राहून एक पाय व मान वर उचलून मध्येच या भांडणांत लक्ष घालून एखादीला नीट ताळयावर आणून, जणू काय खाऊं द्या साऱ्या पोरीबाळींना, असें म्हणताहेत, अशा दिमाखाने प्रथम इकडे तिकडे पाहत व मग एखादा दुसरा दाणा टिपीत. "पहा, पहा, त्याची ऐट पहा." मी एकदम उद्गारलें.

त्यासरशीं "तो स्त्रीदाक्षिण्य दाखवतो आहे!" तोडक्या मोडक्या इंग्रजींत त्या मुलीने उत्तर दिलें.

"ही माझी मोठी मुलगी." शेतकऱ्याने आम्हांला तिची ओळख करून दिली. एका हाताने आपले केस बाजूला करीत लाल लाल झालेल्या हसऱ्या चेहऱ्याने तिने आम्हांला अभिवादन केलें.

"तुमची मुलगी इंग्रजी बोलते अं !"

"होय मिस्. ती शाळेंत शिकते. तुम्ही पहा, आमचा देश इतका लहान आहे की आम्हांला आमच्या भाषेखेरीज निदान दोन तरी

आणखी भाषा माहीत व्हाव्या लागतात; त्याशिवाय आमचें चालायचेंच नाही." त्याच्या या उत्तराने मात्र फरान्स किंवा जर्मनी या देशांपेक्षा येथे बऱ्याच लोकांना थोडेंथोडकें कां होईना इंग्रजी कसें कळतें याचा मला उलगडा झाला.

थोड्या वेळाने गाईंचा गोठा पाहून आम्ही घरांत आलों. घर पाहून मात्र माझें आश्चर्य फारच दुणावलें. चांगल्या जाडजूड पण जुन्या तऱ्हेच्या फर्निचरने तें घर फारच व्यवस्थित शृंगारलें होतें. शेतकऱ्याच्य घरांत आणि एवढें सामान ! असें वारंवार माझ्या मनांत येत होतें. अखेर माझ्याच्याने राहवेना.

"तुमच्यांतील अगदी गरीब लोकांच्या घरांतून सुद्धा एवढें सामान असतें काय ?" माझ्या बरोबरच्या एक डॅनिश गृहस्थाला मी विचारलें, तें शेतकऱ्याने ऐकलें.

"Certainly Miss ! यांत जास्त असें कांहीच नाही. मी कांही श्रीमंत नव्हे. अगदी साधा साधा शेतकरी आहें."

"मग तुम्हांला मधले दलाल पिळून काढीत माहीत ? आमच्याकडे तर शेतकरी म्हणजे दारिद्र्याचें व फोल कष्टाचें एक गमक होऊन बसला आहे."

"पण आम्ही इंग्लंडप्रमाणें लहान शेतकऱ्याला नाहीसा करून मोठ्या जमीनदाराची घरभरणी केलेली नाही. आम्ही लहान लहान आहोंत खरे, पण लहानमोठे सारे एकत्र जमून संघटनेच्या तत्त्वावर आमच्या हक्कांना व हितसंबंधांना जपत असतों. आमचा माल कोठें कसा पाठवावयाचा, भाव काय ठेवायचे हें सारें आमचे लोक ठरवतात. आमच्या सर्वांचा माल एकत्र येतो व नंतर विकला जातो, पण त्यामुळे आमचा नफा एकाच्या खिशांत जात नाही. लहान मोठे सारे यथाशक्ति फायदा खातों आणि फिरून चांगले जगतों.

"तुम्हांला माहीत आहे ? माझ्या देशांत नवकोटनारायण

रॉकफेलर नसतील, नव्हे नाहीतच. पण जिवंतपणीं करपून टाकणारी गरिबी पण फारशी आढळणार नाही."

त्याचें वाक्य 'अगदीं साधें होतें. पण त्यांत किती अभिमान भरला होता ! आणि कां भरूं नये ? आज आमच्यांत भुकेने मरणारे गरीब नाहीत, असें संपन्न व सर्वशक्तिमान् युरोपियन राष्ट्रांपैकी एखादें राष्ट्र किंवा अमेरिका सुद्धा म्हणूं शकेल काय ? खरोखर हिंदुस्थानांतल्या लहानशा प्रांताएवढें सुद्धा तें राष्ट्र नसेल. पण आपसांतील संघटना व सहकार्य यांच्या जोरावर तेथला शेतकरी वर्ग आज सुखी आहे. सगळ्या जगांत 'गरीब बिचारा लहान शेतकरी' असे उद्‌गार ऐकूं येत असतां हें काय कमी आहे !

आज माझ्यापुढे दिसणाऱ्या या शेतकऱ्याच्या मागे सारी संघशक्ति आहे त्यामुळे त्याची मुद्रा दीन, असहाय तर नाहीच; उलट अभिमानाने व ताठ्याने तो वावरूं शकत आहे. आमच्याकडे कधी असें होईल काय !

थोड्या वेळाने संध्याकाळ टळली. आकाशांत सुवर्ण (मधु ?) चंद्राची प्रभा फाकली. जातां जातां शेतांच्या मधून लहान लहान बैठ्या घरांच्या खिडकींतून चौकटींत बसवल्याप्रमाणें कौटुंबिक जीवनाचे निरनिराळे देखावे दिसूं लागले. माझ्या डोळ्यांपुढे मात्र शेतकऱ्याचें सुखी कुटुंब, कोंबडवाड्यांतली मुलगी हींच किती वेळ दिसत होतीं !



आईच्या मऊ मऊ कुशींत एखाद मूल आंग घाशीत पडावें—अगदी तसें त्या हिरवळीवर उठपड उठपड करतां करतां मला वाटत होतें. भोवती कितीतरी स्त्रीपुरुष अर्धवट पडून, अर्धवट बसून एकमेकांशीं गप्पा करण्यांत दंग झालीं होतीं. कांहीजण तर हिरवळीवर संपूर्ण पडून तिचा मानमुराद आस्वाद घेत होते. मलाही तसें करण्याची इच्छा होती, पण हिंमत मात्र नव्हती. त्यामुळेच पाय पसरीत, अर्धवट रेलून पुनःपुनः

मऊ मऊ हिरवळीवर गाल ठेवून पडण्याच्या मोहापासून स्वत:ला सावरीत मी एक गवताची काडी चावीत इकडे तिकडे पाहत होतें, ऐकत होतें. माझ्या हिंदी मैत्रिणींच्या भोंवती चांगलाच गराडा पडला असून एखाद्या किल्ली दिलेल्या यंत्राप्रमाणें त्यांचा शब्द एकसारखा मला ऐकूं येत होता. माझ्याही भोंवती प्रथम माणसें जमलीं होतीं. पण त्यांच्या प्रश्नांना उत्तर देण्यापेक्षा मला अगदी अबोलपणें नुसतें एकटें हिरवळीवर पडून राहणें बरें वाटत होतें.

हिंदुस्थानांत मी वाढलेल्या ठिकाणच्या गावठी पण शांत वातावरणाकरतां माझें मन किती भुकेलें आहे याची मला त्या वेळी कल्पना आली. मी प्रश्नांचीं उत्तरें देण्याचें सहजपणें टाळतां यावें म्हणून दातांनी गवताचें एक पान चावीत चावीत माझ्या मैत्रिणींच्या पाठीशींच पडून राहिलें.

माझे डोळे वरच्या आकाशाच्या नीलिम्याकडे लागले होते. सर्व शरीर भोंवतालच्या थंड, सुखकर वायुलहरींनी व खालच्या हिरवळीने, आईच्या मांडीवर निजलेल्या मुलाप्रमाणें सुस्तावलें होतें. कान मात्र सभोवार होत असलेला नादध्वनि श्रवण करीत होते.

"मिस् मेयोने लिहिलेलें तें सारें खरें आहे का ? हिंदुस्थानांत रस्त्याने सर्प हिंडत असले तर तुम्हांला फिरायला मोठी भीति वाटत असेल नाही? महात्मा गांधीना हिंदुस्थानांत काय समजतात? तुमच्याकडे बाळपणीं लग्नें होतात ना ? मग मोठ्या कुमारिका फारच थोड्या दृष्टीस पडत असतील. तुम्ही काय सारें शिक्षण इंग्लडांत घेतलें? तुम्ही आता बुरखा वापरीत नाही, पण घरी तुम्हांला बुरखा घेऊन चालावें लागत असेल नाही ? ही तुमच्या कपाळावरची तांबडी खूण काय तुमच्या धर्मपंथाची निदर्शक आहे ? " अत्यंत कुतूहलाने विचारलेले असे, एक की दोन, अनेक प्रश्न सारखे इकडून तिकडून माझ्या कानांवर पडत होते. त्यांना उत्तरें देणें शक्यच नव्हतें. कारण खरोखर

प्रश्नांची सरबत्तीच होती ती. इतक्यांत " Miss, तुम्ही फार शांत प्रसन्न दिसतां आहां." एका वयस्क डॅनिश गृहस्थाचे मला उद्देशून काढलेले उद्‌गार.मला ऐकूं आले.

" हो खरंच. आज मला अगदी प्रसन्न वाटत आहे. शिवाय येथल्या प्रेमळ व शांत वातावरणाने घरची पण आठवण होत आहे."

"तुम्हांला आमचा देश आवडला ? "

" खरंच फार आवडला."

" मला पण तुमचे लोक आवडतात. शिवाय हें पहा, महात्मा गांधीना माझ्या वतीने सांगा, की तुमच्या प्रयत्नाविषयीं आमची पूर्ण सहानुभूति आहे ! "

"भेटलें तर अवश्य सांगेन." किंचित् हसत मी उत्तर दिलें.

" पण हें पहा, तुम्ही म्हणतां तुमचें राष्ट्र तर जवळ जवळ अर्ध्या युरोप खंडाएवढें आहे. तर तुमच्या देशांत असले तरी असे इंग्रज किती असतील ? तुम्ही बंड करून त्यांना फेकून कां देत नाही ! "

" सारें खरें. पण बंड केलें तरी आम्हांला एखादा मोठा चाकू किंवा जाड काठी सुद्धा परवानगीशिवाय वापरतां येत नाही. आम्ही शस्त्रहीन लोक आहों. अशा वेळीं सशस्त्र बंडाचा काय उपयोग ! सगळें लष्कर त्यांच्या ताब्यांत."

" होय तेंही खरंच. " असं म्हणून किंचित्‌मात्र तोही माझ्यासारखाच समोरच्या क्षितिजाकडे पाहूं लागला.

थोड्या वेळाने त्याने आपल्या खिशांतून कायसें काढलें.

" तुम्ही आपलें नांव मला माझ्या बायबलमध्ये लिहून देतां का ? "

" हो, त्यांत काय आहे ? "

मी त्याच्या हातांतलें बायबल घेतलें व माझें नांव लिहिलें. त्यानेही त्याचा उच्चार शिकून घेतला व हळूच बायबल खिशांत ठेवीत

त्याने खिशांतून एक लहानसें ख्रिसमस कार्डासारखें चित्र काढलें.

"डेन्मार्कची आठवण म्हणून तुम्ही हें ठेवाल?"

"हो, फारच आनंदाने." मीही उत्तर दिलें.

"तुम्हांला माहीत आहे, मी कोणाचीं नांवें बायबलमध्ये लिहून घेतों?"

मला माहीत नव्हतें. अर्थात् मी प्रश्नार्थक मुद्रेने त्याच्याकडे पाहूं लागलें.

"मला जीं माणसें आवडतात त्यांचीं."

"Thank you," म्हणत असतां मला हसूं आलें. तोही मनापासून हसला!

१९३४.

दृश्य एकोणिसावें

# मिस्टर ब्राइट

"छे बुवा. आपल्याच्याने नाही एवढीं सारीं पुस्तकें वाचणें होत. आणि प्रश्न तर लिहावयाचा आहे उद्या." माझी खुर्ची विस्तवाजवळ ओढीत तक्रारीच्या स्वरांत मी बोलूं लागलें.

"कशावर प्रश्न लिहावयाचा ?" मि. रॅम्सडे हाल (बहुधा ते रामदयाळ असावे. कारण हे गृहस्थ ब्रिटिश गियानांत स्थाईक झालेल्यांपैकी होते) यांनी मला विचारलें.

"कांही नाहीं. महायुद्धानंतर कायद्याच्या दृष्टीने ट्रेड यूनियन चळवळीची पीछेहाट झाली की पाऊल पुढे पडलें हें मला लिहावयाचें आहे आणि त्याकरितां विशेषतः खाणींतल्या मजुरांचा मोठा संप झाला ना, त्या वेळची मला माहिती पाहिजे आहे."

"वाः ! तुमच्याजवळ एक पक्का माहितगार असतां कां पंचाईत करतां ? मि. ब्राइटला विचारा, तो चांगला पुढाकाराने त्या वेळीं भाग घेत होता म्हणे."

"हो तर ! आज संपाची माहिती पाहिजे म्हणून ब्राइटला विचारतें. उद्या Social legislation (समाजविषयक कायदे) विषयीं

कांही लिहावयाचें झालें की एक्सप्रेस डेअरीमधल्या तुमच्या त्या जॉयसला विचारतें ! हवी तेवढी माहितीच माहिती !"

"छे छे तसें नव्हे, तो खरोखर त्यांत पुढारी होता."

"तो सांगतो म्हणून ना !" मी फिरून एकवार हसलें व पुस्तकें आवरून तासाला जावयाची तयारी करूं लागलें.

दुसरा दिवस उजाडला. अजूनही माझा प्रश्न तसाच लिहावयाचा पडला होता. त्यावरची माहिती वाचायला मला मुहूर्तच लागला नव्हता. कशींबशीं एकदाचीं पुस्तकें जमवून कागद गोळा करून मी अभ्यासाला बसूं पाहत होतें. एवढयांत मि. ब्राइटची नेहमीची टकटक ऐकूं आली.

"हं, आंत ये ब्राइट." नेहमीप्रमाणें मी उत्तर दिलें. हातांत एक हूव्हरचा केर काढायचा पंप, ब्रश, खांद्यावर फडकें, तोंडांत एक लठ्ठशी पाईप, अशा थाटांत मि. ब्राइटची स्वारी आंत आली.

"मिस्, मी खोली आता झाडूं की मग झाडूं ?"

"घे घे, आताच झाडून घे. मग एकदम बरें अभ्यासाला बसायला." मी उत्तर केलें व पुस्तकें बाजूस सारून खोलींतल्या विस्तवाशीं शेकीत जाऊन उभी राहिलें.

"फार थंडी आहे नाही ब्राइट ?"

"छे, ही कांहीच नाही. अजून किती तरी पडायची आहे." एका हाताने हूवर ब्रश फिरवतां फिरवतां तोंडांतील पाईप काढून ब्राइटने उत्तर दिलें.

आदल्या दिवसाचें संभाषण माझ्या स्मरणांत अजून ताजें होतें. हा नुसता झाडू मारणारा इसम नसून त्याने संपांत सुद्धा भाग घेतला होता, ही माहिती कांही कमी कुतूहलाची नव्हती. मी ब्राइट-कडे लक्षपूर्वक पाहूं लागलें. त्याची ती ठिगळें दिलेली विजार, किंचित्

मळका सदरा, वर बाह्या खोवलेला त्यावरचा तसाच पुलोव्हर, त्यामधून वर उठून दिसणारा लालसर चेहरा—छे, तो पाहून तर याने संपांत काय काम केलें असेल, याचाच मला प्रश्न पडला. त्याचें तें भरदार रुंद मनगट, अंगमेहनतीने खूप कसलेली शरीराची ठेवण, तो चांगला काम करणारा असावा, याची साक्ष देत होती. पण त्याचा भकास व कदाचित दारूने बथ्थड झालेला चेहरा मात्र मजुरीपलीकडे त्याने कांही केलें असेल असें सांगावयाला तयार नव्हता.

"ब्राइट ! मागे जेव्हा कोळशाच्या खाणीतल्या मजुरांचा संप झाला आणि त्याबरोबर सगळीकडे संप पुकारला गेला, तेव्हाची तुला कांही माहिती आहे ?"

"हो हो तर. माहिती म्हणजे काय ! मी त्यांच्यांत कार्य केलें आहे. मी एका ठिकाणच्या संघाचा पुढारी होतों. संपकमिटींत सुद्धा होतों जी ! मला चांगलीच माहिती आहे."

"असं अस्सं. तरीच मला कोणी तरी सांगितलें, कशाला वाचतां पुस्तकांतून, ब्राइटला विचारा, तो सांगेल तें सारें."

मी हळू हळू ब्राइटला प्रश्न विचारायला सुरवात केली व त्याने मला अगदी पाहिजे ती नसली तरी इतर व गमतीची माहिती पुष्कळ सांगितली. हं सांगतो खरा गंमतीने. हुषार आहे. निदान आपल्या वेळी तरी खास चांगला हुषार असला पाहिजे ! असेल सुद्धा त्यांच्या एखाद्या T. U. (ट्रेड यूनियन) चा पुढारी. सध्या मात्र त्याला पिण्यापेक्षा फारसें कांही माहीत नसावें.—अशी माझी समजूत होऊं लागली. पण आज माझ्या प्रश्नाने त्याला मात्र चांगलाच जोर चढला. माझे प्रश्न थांबवून मी हळू हळू कागद काढून लिहावयाची तयारी करूं लागलें.

ब्राइटने भराभर माझें टेबल साफ केलें. घाण पाणी ओतून टाकलें. बिछाना साफ घातला व अखेरचा हात म्हणन एकवार इकडे तिकडे जरा झटकून स्वारी पिण्याचा लोटा भरून आणण्यास गेली.

मी ब्राइटला एखाद्या सामान्य नोकरापेक्षा कधीच जास्त समजलें नव्हतें. त्यामुळे त्याने कधी हिन्दुस्थानविषयीं मला कांही प्रश्न विचारले तरी फारशीं उत्तरें न देतां मी फक्त त्याला तोडून टाकीत नसें एवढेंच. पण आज मात्र मी त्याच्याकडे सामान्य नोकरापेक्षा थोड्या अधिक योग्यतेच्या समजुतीने पाहूं लागलें.

पाण्याचा लोटा घेऊन ब्राइट आंत आला. त्याने टेबलावर पाणी झाकून ठेवलें. चोहोकडे एकदा फिरून सर्व नीट आहेना अशी खात्री करून घेतली आणि प्रश्न विचारायच्या निमित्ताने माझ्याशीं फिरून बोलायला सुरवात केली. "काय तुम्ही केली सुरुवात अभ्यासाला–?"

"मग काय करायचा नको का? अभ्यास न करून कसें चालणार!"

"By the way (आपलें सहज म्हणून), बाई तुम्हांला या संघाच्या माहितीशीं काय करावयाचें? तुम्ही येथे कसला अभ्यास करतां?" त्याच्या मनांत खवखवत असलेला प्रश्न त्याने अखेर विचारलाच.

मी त्याला थोडक्यांत मी येथे कां आलें, Social Science (समाजशास्त्र) चा कसा अभ्यास करतें आहें, हें सांगितलें.

"मग तुम्ही येथून गेल्यानंतर तुम्हांला चांगली मोठी नोकरी मिळेल तर!"

"नोकरीच कशाला? नोकरी मिळाली तर ठीकच. पण नाही मिळाली तरी मला माझ्या देशांत केवढें तरी काम करतां येईल!"

ब्राइट माझ्या ड्रेसिंग टेबलावरच्या बारीकसारीक वस्तू नीट पुशीत माझ्याशीं बोलत होता. माझ्या उत्तरासरशीं त्याने तोंडांतली पाईप काढून एकवार माझ्याकडे पाहिलें व म्हणाला, "Oh, you are one of those few who can afford" (अस्सें, ज्यांना स्वतःचें पुरेंसें आहे अशा थोड्या लोकांपैकी तुम्ही आहां.) आणि हळूहळू नकशी कामांतील धूळ हातांतील फडक्याने जास्त बारकाईने पुसूं लागला.

ब्राइट खोली स्वच्छ ठेवीत असे, पण इतकी बारकाईची स्वच्छता फक्त बोलण्याचें निमित्त म्हणूनच होती हें मी तेव्हाच ओळखलें. अर्थात् तो मात्र जणू काय खरोखर साफ करण्यांत सारें लक्ष गुंतलें आहे असें दर्शवीत कांही वेळ पुशीत राहिला.

मग हळूच माझ्याकडे वळून म्हणतो, " मिस्, तुम्हांला खरोखरी आमच्याकडे येऊन आपण कांही घेऊन जाऊं शकूं असें वाटतें काय ? "

" कां नाही ? आता तुमचीच कोळशाच्या खाणींतल्या मजुरांची T. U. (मजूर संघ) पहा ना, केवढी जबरदस्त संस्था आहे. तशीच कापडाच्या गिरण्यांतल्या मजुरांची. आमच्याकडे अजून इतकें जबरदस्त असें कांही सुद्धा नाही. शिवाय तुमच्याकडे Unemployment Insurance (बेकार भत्ता) Health Insurance (आरोग्य विमा) असल्या कायद्यांनी किती सुधारणा घडवून आणली आहे ! जन्मापासून मरेपर्यंत निरनिराळ्या निमित्ताने तुमच्या देशांतील गरीब माणसाला कायद्याने थोडें फार, बरें वाईट, कमें का असेना, संरक्षण दिलें आहे. पण आमच्याकडे तसें कांही नाही. Old age pension (म्हातारपणचें पेनशन) जाऊं द्या. पण एखादा म्हातारा अगदी अंथरुणावर पडला, तर केवळ सगेसोयरे, शेजारी यांच्या भलेपणावर विसंबून राहिल्याशिवाय त्याचे हाल कुत्रासुद्धा खाणार नाही ! "

ब्राइट माझ्याकडे अगदी सरळ रोखून पाहूं लागला. बहुधा माझी खोली साफ करणारा तो एक यःकश्चित नोकर हें तो क्षणभर विसरला असावा.

एकदम गंभीर आवाजाने तो म्हणाला, "Miss, take it from me (बाई, माझ्या सांगण्यावर विश्वास ठेवा) हें जें सर्व तुम्हांला वरवरचें दिसतें आहे, ती निव्वळ डागडुजी आहे आणि त्याचा खरोखर कांही कांही उपयोग नाही. आमच्या ह्या सर्व संस्था, कायदे, सुधारणा ह्यांनी खरोखर मूळ प्रश्न आम्ही सोडवला आहे असें तुम्हांला वाटलें काय ? तसें असेल तर ही बेकारांची, भुकेबंगालांची संख्या फुगत कां

चालली आहे? सरकार त्याकरतां काय करतें आहे! बेकार भत्ता! हं आणखी कांही नाही! बेकार भत्ता व त्याबरोबर हळूच Means test (साधनांचें परीक्षण)! कसे ठरवणार आहेत हे Means test! मी म्हणतों काम द्या, नाही तर सरळ पूर्ण बेकार भत्ता द्या. ही फसवणूक कशाला!"

आपण मिस लीचकडे खोल्या साफसूफ करून झाडायला नोकर आहों हें तो आता पूर्णच विसरला.

"म्हणे बेकार भत्ता! बाई, मी तुम्हांला सांगतों, खरोखर या बेकार भत्त्यासारखें अपमानास्पद कांही नाही. बेकार भत्ता कां म्हणून! लोखंडाच्या कांबीसारखे एवढे आमचे हात चांगले कामाला समर्थ असतांना घरांत निरुद्योगी आळशी राहून अपमानास्पद बेकार भत्ता घ्यावयाचा!"

हाइड पार्कमध्ये पेटीवर उभें राहून भाषण करणाऱ्या रस्त्यांतील वक्त्यांची मला आठवण झाली.

"मिस्, तुम्हांला खरोखर माहिती पाहिजे असेल तर माझ्या बरोबर माझ्या परगण्यामध्ये चला. आणि मग पहा या सर्व सुधारणा, कायदे, संस्था यांच्या रंगसफेतीखाली दडून असलेलें खरें इंग्लंड तेथे तुम्हांला दिसेल. आज तेथे माझ्यासारखे किती दणधाकट लोक घरीं स्वस्थ बसून आहेत. काम करावें तर काम नाही–एवढेंच नव्हे, काम मिळण्याची सुद्धा जवळपास आशा दिसत नाही. मी तुम्हांला सांगतों, माझ्यासारखे चांगले एवढे दणधाकट लोक पण घरीं बसून निव्वळ कुजून जात आहेत. रोज सकाळ झाली की धाकटी घरांतली पोरगी–तिला काम मिळतें–ती कामाला जाते. येवढेंच नव्हे, मिसिसला सुद्धा काम लागतें. आणि माझ्यासारखाच दणकट माणूस–मोठा पोरगा–ह्यांना काम नाही. त्याची मजुरी भारी–धंद्याला झेपत नाही.

"मनुष्याला–पुरुषाला–यापेक्षा अपमानास्पद आणि लाजिरवाणें तें काय पाहिजे. चांगलीं दणकट धीराचीं माणसें तीं, बोलत नाहीत.

जवळच्या Pubमध्ये (गुत्यामध्ये) जातात आणि दारू पितात—सगळें विसरून झिंगून जाईपर्यंत दारू पितात. आणि मग घरीं आल्यावर आपल्या कणखर हातांची रग मिसेसवर (बायकोवर) काढतात.

"मग हीं तुमच्या परोपकारी संस्थेंतलीं माणसें त्यांना दारू पिऊं नये, झिंगूं नये, म्हणून उपदेश करायला येतात. बेकारांच्या संस्था काढून त्यांना विरंगुळा वाटावा म्हणून शिकवतात, नाटकें करतात. खरोखर अशा पोरी येऊन कांही सांगूं लागल्या, की मला एक चांगला दंडुका घेऊन पाठींत घालावा असें वाटूं लागतें.

"मिस्, मी आता तुम्हांला झाडतांना दिसतों आहें. तुम्हांला वाटेल हा यःकश्चित झाडूवाला, याला काय कळतें ? पण मी सांगतों, खाणींतल्या यःकश्चित मजुरापासून तों पार्लमेंटचा मेंबर होण्या-पर्यंत मी स्वतःच्या कर्तबगारीने चढत गेलों आहें. मी एम. पी. (मेम्बर ऑफ पार्लमेण्ट) होतों. माझ्या काऊंटीतर्फे आलों होतों."

त्याचे हे शब्द ऐकतांच मी आश्चर्याने जवळ जवळ थिजून त्याच्याकडे पाहूं लागलें. माझ्या कानांवर माझा विश्वास बसेना. आमच्यावर राज्य करणाऱ्या एका मोठ्या महान साम्राज्याचीं सारीं सूत्रें हालविणाऱ्या एका सभेचा हा सभासद ! आणि तो माझ्या खोलींत झाडू फिरवतो आहे ! माझे डोळेही विश्वास ठेवायला तयार होत ना.

आतापर्यंत हा नीट बोलला खरा. पण अजून रात्रीं चढलेली याची नशा पुरी उतरलेली नसावी.

अखेर माझ्या सर्व खळबळीचा शेवट म्हणून माझ्या चेहेऱ्यावर फक्त हसूं मात्र उमटलें.

"खरंच मिस्, मी अगदी शुद्धीवर असून बोलत आहें. मी सारें पाहिलें आहे, अनुभवलें आहे. आणि म्हणूनच या सर्व परोपकारी संस्था, त्यांची सहानुभूति, यांचें खरें स्वरूप मला माहीत आहे.

"बोलल्याचा राग मानूं नका, पण अगदी खरें सांगतों, या सर्व संस्था—यांची सहानूभूति—निव्वळ वरवरची, कोरडी आहे. भोगल्या-

शिवाय त्याला खरा पीळ येतच नाही. त्या मोठ्या संपांत आज हा आमच्याशीं सहानुभूति दाखवणारा 'मधला वर्ग', त्यांच्या संस्था, यांनी दुसऱ्या बाजूला मदत केली नसती तर आम्ही संपही हरत नव्हतों आणि कांही होत नव्हतें. मग १९२९तल्या सारखा संपाचा कायदा पास करण्याची House ची (पार्लमेंटाची) काय बिशाद होती !

"आमच्यावरोबरच भरडला जात असलेला हा 'मध्यम' वर्ग आमच्याशी सहकार्य करील असें आम्हांला वाटलें. पण ते दुसऱ्या बाजूला झाले. खरोखर त्यांनीच मजुरांच्या चळवळीचें पेकाट मोडल्यासारखें केलें.

"म्हणे या लढयांत त्रयस्थाची गैरसोय ! Hang it (मरूं द्या). अरे जेथे स्वतःचा गळा सापडतो आहे तेथे त्रयस्थाची कोण परवा करतो ! पण त्यांना तेवढीच स्वतःची सोय गैरसोय दिसते. मी खरोखर सांगतों, तुमच्या या 'मधल्या वर्गा'ला जोंपर्यंत स्वतःला गैरसोय किंवा धक्का सहन करावा लागला नाही, तोंपर्यंतच तुम्ही मजुरांशीं सहानुभूति दाखवितां, त्यांचीं दुःखें वेशीवर टांगण्याचा आव आणतां, भांडवलशाहीशीं झगडण्याचें सोंग करतां. पण जरा धक्का लागला की तुम्ही सरलांच दुसऱ्या बाजूला. हें त्यांतलें तथ्य म्हणा, सत्य म्हणा, काय आहे तें आहे."

"असेल, पण तुम्हांला इतकें कळूं लागायला सुद्धा अखेर असलेच प्रयत्न कारणीभूत झाले आहेत. तसें नसतें तर आज इंग्लंडांतील मजुरांची स्थिति काय असती ?"

"हं, तें खरें ! अगदीच नाही असें नाही"—बोलण्याच्या कैफांतून फिरून भानावर यावें—तसें होऊन त्याने उत्तर दिलें.—"तरी पण त्याचें व्यर्थत्व पटल्याखेरीज राहत नाही....

"अरे बापरे ! अकरा वाजले की." घड्याळाकडे पाहत त्याने उद्गार काढले. बसला गेलें पाहिजे म्हणून दार बंद करून हूवर ब्रश उचलून तो खालची खोली झाडायला गेला.

थोडा वेळ मीही माझा अभ्यास सोडून त्याच्या बोलण्याचा विचार करीतच राहिलें.

दोन दिवसांनी संध्याकाळीं माझ्या खोलींत पाणी ठेवण्याकरतां ब्राइट आला, तेव्हा त्याच्या हातांत एक पाकीट होतें.

"मिस्, तुम्हांला एक गंमत दाखवूं कां ?"

"अवश्य. ब्राइट, काय आहे तें ?"

ब्राइटने M. P. (पार्लमेंटचा सभासद) असतांना आपल्या शायरमध्ये संपाबद्दल भाषण करीत असतांनाचें स्वतःचा फोटो असलेलें एक कटिंग आणलें होतें.

माझी खात्री पटली. खरंच तो M. P. होता. मी त्याला बरें वाटावें म्हणून भाषण वाचण्याच्या निमित्ताने त्याचें कटिंग ठेवून घेतलें. त्यानंतर अशीच चौकशी करतां मला कळलें की संपानंतरच्या निवडणुकींत तो हरला. त्याच्या बऱ्याच एकांगी वृत्तीकडे झुकणाऱ्या मतांमुळे त्याचें कामही गेलें. खाणींतही काम मिळेना, तेव्हा तो इकडे आला व तेव्हापासून लंडनमध्येच काम करून राहतो आहे.

पोरेंबाळें बायको कोणी नाहीत त्याला ?

वा: ! सारीं आहेत तर काय झालें. पण हा चिकार पितो. कसें पटणार याच्याशीं—

१९३४.

मराठी वाङ्मयांत

# सुविचार प्रकाशन मंडळ

हें नांव उत्कृष्टतेचें गमक समजलें जातें.

कारण

**मनोरंजक, तशींच विचारप्रवर्तक पुस्तकें**

**काळजीपूर्वक निवडून**

या संस्थेकडून प्रकाशित केलीं जातात.